

# बालभारती



## मराठी, पुस्तक दुसरे



शिक्षणखात्याचा मंजुरी – क्रमांक : पपम १०० (भाषा) (२) ह, दि. २८–४–१९६९

# बालभारती

## मराठी, पुस्तक दुसरे






१९७८

महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ,
पुणे

प्रथमावृत्ती : १९६९
पुनर्मुद्रण : १९७८
आठवे
नववे



कागद :
६१×८६ सेमी
६० ग्रॅम/चौ. मी.
व्हाईट प्रिंटिंग पेपर

"ह्या पुस्तकाचा कागद महाराष्ट्र राज्य शिक्षण खात्याने सवलतीच्या दरात उपलब्ध करून दिला आहे."

मुद्रणादेश :
टीओ-टीबी/९७६७/३०-९-७७
(४ लाख)

मुद्रक :
एब्राहम जॉर्ज
न्यू जॅक प्रिंटिंग वर्क्स
प्रा. लि.
मुंबई ४०००१३

प्रकाशक :
बा. गो. थोरात
नियंत्रक,
पाठ्यपुस्तक निर्मिती मंडळ
मुंबई ४०००१८

## प्रस्तावना

शासनमान्य अभ्यासक्रमानुसार पाठ्यपुस्तकांची निर्मिती व्हावी या उद्देशाने महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळाची स्थापना झालेली आहे. मंडळाने इयत्ता १ ते ७ पर्यंतच्या विविध विषयांच्या पाठ्यपुस्तकांच्या निर्मितीचा कार्यक्रम आखलेला असून सदर पाठ्यपुस्तक त्यानुसार तयार केले आहे. ते तयार करताना शिक्षक, शिक्षणशास्त्रज्ञ आणि विविध शिक्षणसंस्था यांनी पाठवलेल्या सूचनांचा काळजीपूर्वक विचार करण्यात आला असून ते अधिकाधिक निर्दोष कसे करता येईल याकडे लक्ष पुरवण्यात आले आहे.

भारत सरकारने मान्य केलेल्या व महाराष्ट्र शासनाने स्वीकारलेल्या देवनागरी लिपीतील सुधारणा व जोडाक्षर-पद्धती यांचा या पुस्तकाच्या मुद्रणात अवलंब केला आहे.

संचालक
महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ

पुणे : ४११००४
२८ एप्रिल १९६९
वैशाख ८, १८९१

# प्रतिज्ञा

भारत माझा देश आहे. सारे भारतीय माझे बांधव आहेत.

माझ्या देशावर माझे प्रेम आहे. माझ्या देशातल्या समृद्ध आणि विविधतेने नटलेल्या परंपरांचा मला अभिमान आहे. त्या परंपरांचा पाईक होण्याची पात्रता माझ्या अंगी यावी म्हणून मी सदैव प्रयत्न करीन.

मी माझ्या पालकांचा, गुरुजनांचा आणि वडीलधाऱ्या माणसांचा मान ठेवीन आणि प्रत्येकाशी सौजन्याने वागेन.

माझा देश आणि माझे देशबांधव यांच्याशी निष्ठा राखण्याची मी प्रतिज्ञा करीत आहे. त्यांचे कल्याण आणि त्यांची समृद्धी ह्यांतच माझे सौख्य सामावले आहे.

# अनुक्रमणिका



# १. ऊठ मुला !

ऊठ मुला, ऊठ मुला,
बघ हा अरुणोदय झाला !

किलबिलती, बागडती
झाडांवरती पक्षि किती !

फुलांवरी, फळांवरी
पतंग मोदे मजा करी !

झटकन् बसे, चटकन् उठे,
उंच भराऱ्या घेत सुटे !

शीतल हा वात पहा
आळस हरण्या, येत अहा !

पूर्वेला रवि आला
मुला, उठाया कथित तुला !

✤ ✤ ✤

अभ्यास :

१. मुलाला कोण उठवत आहे ? कोणत्या वेळी ?
२. पक्षी काय करीत आहेत ?
३. फुलांफळांवर बसून कोण मजा करीत आहे ?
४. उगवत्या सूर्याबद्दल पाच ओळी लिहा.

## २. सशाचे कान झालेत लांब



पांढरा पांढरा ससा, देवाजवळ राहायचा,
हरणाच्या रथातून फिरायचा—
इवल्या इवल्या कानांचा
आणि गुंजासारख्या डोळ्यांचा.



एकदा देवाने सशाला बोलावले
आणि त्याला काम सांगितले,
"नारद बसले आहेत बागेत,
त्यांना घेऊन इकडे ये पळत!"
सशाने ऐकले—
'नारळ पडले आहेत बागेत,
त्यांना घेऊन इकडे ये पळत.'

ससा धांदरट फार.
ससा खूप जोरात पळाला
आणि एकदाचा बागेत आला.
'नारळ तर झाडाला,
ते लागायचे कसे हाताला?'
नारळ काही पडेना, झाडावर चढता येईना!
ससा बसला रडत. देव आला बागेत.

देवाने विचारले,
"ससेराव, ससेराव, का रडता ?
नारळाच्या झाडाआड का दडता ?"
ससा म्हणाला,
"नारळ काही पडेना !
झाडावर चढता येईना !
नारळ आणू कसा ?"





देव म्हणाला,
"मी बोलावले नारदाला
आणि तू ऐकलेस 'नारळाला !'
ऐकत नाहीस नीट, थांब,
कान तुझे करतो लांब."
देवाने ओढले सशाचे कान
तेव्हापासून ते झालेत लांब !

✤ ✤ ✤

अभ्यास :

१. देवाने सशाला कोणते काम सांगितले ?
२. ते काम त्याला का करता आले नाही ?
३. सशाचे कान लांब कसे झाले ?



# ३. वाऱ्याच्या पाठीला सुटली खाज !

एकदा वाऱ्याच्या पाठीला सुटली खाज.
अशी खाज सुटली, अशी खाज सुटली,
की तो सैरावैरा पळत सुटला !
वाटेत भेटले त्याला एक पिंपळाचे झाड.
पिंपळाच्या झाडाने विचारले,
"असा पळत काय सुटला आहेस सैरावैरा ?"
वारा म्हणाला, " अरे माझ्या पाठीला सुटली आहे खाज.
काय करू नि काय नको, असे झाले आहे;
म्हणून पळतोय जीव घेऊन."
झाड म्हणाले, "अरे, इकडे ये,
माझ्या खरखरीत अंगाला तुझी पाठ घास;
मग तुला बरे वाटेल."
वाऱ्याने पिंपळाच्या अंगाला आपली पाठ घासली खसखसा;
पण त्याला आराम वाटणार तरी कसा ?
पिंपळाचे अंग काही तितकेसे खरखरीत नव्हते.





तेव्हा तसाच तो पुढे पळत सुटला. पुढे भेटले त्याला एक वेळूचे बन.
वाऱ्याला पळताना पाहून त्याने विचारले मान वेळावून, वेळावून,
"माझ्या टोकदार बोटांनी मी देऊ का तुझी पाठ खाजवून ?"
वारा अगदी खूष झाला मनात
आणि घुसला सरळ वेळूच्या बनात.
पण वेळूच्या बनाने त्याची पाठ काही खाजवली नाही.
गुदगुल्या मात्र केल्या त्याला भरपूर !
वारा खो खो हसत बाहेर पडला
आणि तसाच पुढे पळत सुटला.
पुढे भेटले त्याला एक फणसाचे झाड.
त्याच्या अंगाला लटकत होते फणस जड जड.
वाऱ्याला पळताना पाहून फणसाच्या झाडाने म्हटले,
"माझ्या अंगावर मोठमोठे,
खरखरीत ब्रश आहेत चांगले.
तुझी पाठ त्यांच्यावर घास
आणि मग बघ कसे वाटते झकास !"
वाऱ्याने पाहिले,



खरेच चांगले, मोठमोठे, खरखरीत ब्रश !
त्याने त्या ब्रशांनी पाठ आपली
खराखरा खाजवून घेतली.
आणि मग——
वाऱ्याची स्वारी आमराईत जाऊन स्वस्थ निजली.



❀ ❀ ❀

**अभ्यास :**

१. वारा कसा पळत होता ? का ?
२. वाऱ्याला कोण कोण भेटले ?
३. वेळूच्या वनाने वाऱ्याची काय गंमत केली ?
४. वाऱ्याच्या पाठीची खाज अखेर कोणामुळे थांबली ?
५. पुढील ओळी पूर्ण करा :
   (अ) वारा ..................... पळत सुटला.
   (आ) वारा अगदी ..................... झाला मनात.
   (इ) काय करू ..................... असे झाले आहे.

# ४. गर्विष्ठ कावळा



एक होता कावळा. काळा काळा. जसा काही कोळसाच. तो होता मोठा गर्विष्ठ. तो नेहमी म्हणायचा, "माझ्याइतक्या वेगानं कोण उडू शकतो ?"

त्याला एकदा भेटली चिमणी. इवलीशी. तिला तो चिडवू लागला—

"चिव चिव चिमणी चिमुरडी
आहेस अगदी भिकारडी....

आणि ऐट किती मिरवतेस ? तुला माझ्याइतक्या वेगानं उडता येत नाही आणि उगाच ठुमकत ठुमकत चालतेस ! चल लावू या आपली शर्यत. त्या दूरवर दिसणाऱ्या समुद्रापर्यंत कोण आधी जातं, ते पाहू या."

दोघेही उडत चालली. कावळा पुढे आणि चिमणी मागे. उडता उडता चिमणी बिचारी दमली. थकून भागून एका झाडावर जाऊन बसली.





ते पाहून कावळ्याला आणखीच गर्व झाला. तो उडत उडत पुढे निघाला. त्याला भेटला एक मोर. त्याला पाहून कावळा म्हणाला,

"नाच नाच नाचतोस मोरा
उगाच मिरवतोस आपला तोरा !

अरे, माझ्याइतक्या वेगानें उडता येतें का तुला ? थुईथुई नाचणं तेवढं तुला येतं. नेहमी उगाच फुशारकी मारत असतोस. चल, लावू या आपली शर्यत. त्या दूरवर दिसणाऱ्या समुद्रापर्यंत कोण आधी जातं, पाहू या."

मोराला कावळ्याचा राग आला. दोघांची शर्यत लागली. कावळा पुढे आणि मोर मागे. खूप खूप लांब गेले ते. मोर बिचारा दमला. तो गयावया करून म्हणाला, "आता आपण थांबू या." पण कावळा कसचा थांबतो ! तो गर्वाने पुढेच निघाला. मोर दमला आणि तो एका झाडावर जाऊन बसला.

पुढे लागले एक सरोवर. तेथे एक घार होती. तिला पाहून कावळा म्हणाला,

"घारे, घारे, उंच उडतेस आकाशी
शर्यत लावतेस का माझ्याशी?
त्या दूर दिसणाऱ्या समुद्रापर्यंत माझ्याबरोबर उडत येतेस का?
पाहू या, कोण आधी जातं ते. लावू या आपली शर्यत."

कावळ्याचा गर्विष्ठपणा पाहून घारीला हसू आले. त्या दोघांची शर्यत लागली. घारीचा झपाटा मोठा. ती केव्हाच पुढे निघून गेली. कावळ्याचे पंखही दुखू लागले. त्याला खूप खूप दम लागला. धापा टाकत टाकत तो घारीला म्हणाला, 'ताई, ताई, आता तू थकली असशील. आपण या खडकावर थोडी विश्रांती घेऊ या."



घार म्हणाली, "का रे बाबा? आपल्याला त्या दूर दिसणाऱ्या समुद्रापर्यंत जायचं आहे ना? पाहू या, आधी कोण जातं ते."

कावळा खूप दमला होता. तो घारीची मनधरणी करू लागला. घार हसून त्याला म्हणाली, "काय कावळेदादा, फिटली का तुझी शर्यतीची हौस?"

❖ ❖ ❖

**अभ्यास :**

१. कावळ्याने कोणाकोणाशी शर्यत लावली? कशाची?
२. कावळ्याची शर्यतीची हौस कशी फिटली?

# ५. ओळखा, कोण ?



हिरवं अंग, लाल चोच
गळ्यात माझ्या काळा गोफ
खातो डाळ, पेरूची फोड
बोलतो विठ्ठू विठ्ठू गोड.
ओळखा, कोण ?
सांगा पट् पट् !
—तू तर आमचा
लाडका पोपट !

निळे पंख, लाल डोळे
छाती काढून ऐटीत चाले
गुटर्रगूंऽ गुटर्रगूंऽ
कोण करतं ? सांगा बघू !
—ते तर कबूतर
घुमतंय उंच छपरावर !



उंचाडी मान  फत्ताडे पाय
वाकडी पाठ  डुगूडुगू जाय
तुडवीत जातो  वाळवंट.
कोण ते ? सांगा बघू !
—उंट, उंट !





अंगावर पट्टे
कान छोटे छोटे
काटकुळे पाय
लांबुटकी मान
मी तर खातो
शेंड्याचं पान.
ओळखा, कोण ?
हरलात साफ ?
अहो, मी तर
जिराफ, जि-रा-फ !

**अभ्यास :**

१. या कवितेत कोणाकोणाची माहिती आली आहे ?
२. त्यांपैकी तुम्हांला कोण आवडते ? का ?
३. तुम्हांला आवडणाऱ्या प्राण्याचे अथवा पक्ष्याचे तीन-चार ओळींत वर्णन करा.

# ६. कणभर तीळ

वाटाणा, फुटाणा, शेंगदाणा
उडत चालले टणाटणा !
वाटेत भेटला तिळाचा कण
हसायला लागले तिघेही जण !







तीळ चालला भरभर
थांबत नाही कुठे पळभर !
"तिळा, तिळा, कसली रे गडबड ?"
"थांबायला वेळ नाही.
सांगायला वेळ नाही.
काम आहे मोठं, मला नाही सवड !"
"ऐक तर जरा, पहा तर खरा,
कणभर तिळाचा मणभर नखरा !"
"बघा तरी थाट ! सोडा माझी वाट !"
"बघू या गंमत, करू या जंमत !
चला रे जाऊ याच्याबरोबर."

तीळ चालला भराभर. वाटेत लागले ताईचे घर.
तीळ शिरला आत, थेट सैपाकघरात.
ताईच्या हातात छोटीशी परात
हलवा करायला तीळ नाही घरात!
ताई बसली रुसून, तीळ म्हणतो हसून,
"घाल मला पाकात, हलवा कर झोकात."
ताईने टाकला तीळ परातीत.
चमच्याने थेंब थेंब पाक ओतीत,
इकडून तिकडे बसली हालवीत.
शेगडी पेटली रसरसून,
वाटाणा, फुटाणा, शेंगदाणा गेले घाबरून!





पण तीळ पाहा कसा ?
हाय नाही, हुय नाही, हासे फसफसा !
पाकाने खुलतोय, काट्याने फुलतोय !
अरे, पण हे काय ? तीळ कुठे गेला ?
काटेरी, पांढरा हलवा कुठून आला ?
"वाटाण्या, फुटाण्या, शेंगदाण्या,
पाहिलीत गंमत ? कणभर तिळाची मणभर करामत !
एवढासा म्हणून हसलात मला,
खुलवीन मी तर सर्व जगाला !"

* * *

अभ्यास :

१. हलवा कोणत्या सणाला करतात ? तो कसा तयार करतात ?
२. तिळाची मणभर करामत कोणती ?
३. पुढील ओळीतील गाळलेले शब्द भरा :
तिळगूळ वाटताना '........ घ्या ........ बोला' असे म्हणतात.
४. पुढे दिलेल्या शब्दांमधून योग्य शब्द निवडा व खालील ओळी पूर्ण करा :
रसरसून, नखरा, काट्याने, पाकाने.
(अ) कणभर तिळाचा मणभर ........
(आ) शेगडी पेटली ........
(इ) ........ खुलतोय ........ फुलतोय.

# ७. नागपंचमी



श्रावण महिना आला. झिमझिम पाऊस पडला. चला, चला खेळायला. नागपंचमीचा सण आला.

खेळायला जीग रोवले. झाडांना झोके बांधले. नदी-नाले ओसरले. हिरवे रान डोलू लागले.

नागपंचमीचा सण मुलींचा. बायकांच्या आवडीचा. नागोबाच्या पूजेचा. वारुळाला जायचा. फेराची गाणी गायचा.

चल ग सये वारुळाला
नागोबाला पुंजायाला
हळदकुंकू वाहायाला
ताज्या लाह्या वेचायाला.

नागोबाला घेऊन गारुडी येतो. अंगणात पुंगी वाजवतो. नागाला डुलायला लावतो. नागोबाला दूध मागतो. नाचत नाचत नागोबाला खेळवतो. नागपंचमीला खूप खूप खेळायचे. खेळताना कोणी नाही रुसायचे. लहानमोठे नाही मानायचे. गाणे म्हणताना मागे नाही सरायचे.



बा. भा. २१६



श्रावण हुंकारी हुंकारी
करा ग पंचीम साजरी
या बाई पंचीमीची साडी
आणील मामा जरिकाडी.

खेळगड्यांनी अंगण घुमले पाहिजे. ठेक्यात नाचगाणे झाले पाहिजे. सर्वांनी त्यात भाग घेतला पाहिजे. घरोघरीच्या मुली जमल्या पाहिजेत.

रुणझुण पाखरा जा माझ्या माहेरा
कमानी दरवाजा त्यावरी बैस जा
घरच्या आईला सांगावा सांग जा
दादाला सांग जा ने मला माहेरा.

खेळताना गीत सांगावे. झिम्म्याला टाळ्या पडाव्यात. ठेक्यात नाचणे व्हावे. फुगडी खेळावी, पिंगा घालावा. चुईफुई घुमवावी. घागर फुंकावी. सूप नाचवावे. फेर धरावेत. घोळ्यामेळ्यांनी खेळ खेळावेत. एकीने गाणे सांगावे. इतरांनी तसे ते म्हणावे.

सइ सइ गोविंदा येतो
मजवरि गुलाल फेकीतो
तुझ्या बाई गुलालाचा भार
आमच्या वेण्या झाल्या लाल
आमच्या वेण्या मोकळ्या
सोनीयाच्या साखळ्या
घड रे, घड रे सोनारा
माणिकमोती बिजवरा
बिजवराला खिडक्या
आम्ही बाई लेकी लाडक्या
लाड सांगू बापाला
मोती मागू कापाला.

नागपंचमीला खूप खेळ खेळतात. रात्रभर खेळतात, पण कोणी दमत नाही. कोणी कंटाळत नाही. कोणी रागावत नाही. कोणी रुसत नाही. सगळे कसे मजेत चालते.

* * *

बिजवर – एक प्रकारचा दागिना. काप – स्त्रियांच्या कानांतील एक प्रकारचा दागिना. जीग – लाकडी खांब.

अभ्यास :

१. नागपंचमीच्या सणाला कोणाची पूजा करतात ?
२. नागपंचमीचा सण मुली व स्त्रिया कसा साजरा करतात ?
३. नागपंचमीला मुली कोणकोणते खेळ खेळतात ?
४. तुम्ही पाहिलेल्या एखाद्या खेळाचे पाच-सहा ओळींत वर्णन करा.

# ८. चांदोबाचा अंगरखा

रात्रीची वेळ होती. थंडी बरीच पडली होती. आभाळात चांदोबा उघडाच फिरत होता.

चांदोबा आईकडे गेला आणि म्हणाला, "आई, आई, मला फार थंडी वाजते. मला एक अंगरखा शिवशील ?"

जवळ बरेच ढग जमले होते. आईने एक पांढरा पांढरा ढग घेतला आणि चांदोबाला एक उबदार अंगरखा शिवला. चांदोबा तो अंगात घालून फिरू लागला. दुसऱ्या रात्री चांदोबा आईकडे रडत गेला आणि म्हणाला, "आई, माझा अंगरखा सैल कर. मला तो फार घट्ट होतो आहे !"

आईने पाहिले तो खरेच, आज चांदोबा थोडा मोठा झाला होता. तिने अंगरखा थोडासा सैल करून दिला. त्यानंतर दोन दिवस गेले.

तिसऱ्या रात्री चांदोबा फिरून आईकडे रडत गेला आणि म्हणाला, "आई, माझा अंगरखा आणखी सैल कर. मला तो फार घट्ट होतो आहे."

चांदोबा आज आणखी मोठा झाला होता. आईने अंगरखा

आणखी सैल केला. असे पंधरा दिवस झाले. रोज रात्री चांदोबा मोठा होई आणि रोज आईला अंगरखा सैल करावा लागे.

तिसऱ्या रात्री चांदोबा आईला म्हणाला, "आई ग, आज मला अंगरखा सैल होतो आहे! जरा घट्ट कर."

आईने पाहिले तो खरेच, आज चांदोबा जरा लहान झाला होता. आईने अंगरखा जरा घट्ट केला.

त्या रात्रीपासून चांदोबा लहान लहान होत चालला. रोज रात्री तो आईकडे रडत जाई आणि आईला त्याचा अंगरखा थोडा थोडा घट्ट करावा लागे. असे पंधरा दिवस गेले.

शेवटी आई फार कंटाळली. तिने चांदोबाचा अंगरखा काढून टाकला.

तेव्हापासून चांदोबा आपला आभाळात उघडाच फिरत असतो.

* * *

अभ्यास :

१. चांदोबाचा अंगरखा कशाचा होता?
२. चांदोबाचा अंगरखा रोज सैल का करावा लागे?
३. त्याचा अंगरखा घट्ट केव्हा करावा लागला?
४. चांदोबाचे चित्र काढा.
५. तुम्ही चंद्र आहात असे समजा आणि हीच गोष्ट तु



# ९. फुगडी खेळू ग फिरकीची



फुगडी खेळू ग फिरकीची
तिरक्या तिरक्या ग गिरकीची !

फिरतिल वेण्या गर गर गर
करतिल पैंजण थर थर थर
भुईवर चित्रे ग कमळाची
फुगडी खेळू ग फिरकीची
तिरक्या तिरक्या ग गिरकीची !



गोरा गोरा एक मनोरा
फिरता तरिही उभा भोवरा
सीमा झाली ग हौसेची
फुगडी खेळू ग फिरकीची
तिरक्या तिरक्या ग गिरकीची !



माझा ७.
होतो आहे. "
वेळता मुली भुईवर कशाची चित्रे काढणार आहेत ?
चांदोबा आज
पा भोवरा', हे कशाबद्दल म्हटले आहे ?

# १०. थेंबा, थेंबा, येतोस कोठून ?

“थेंबा, थेंबा, कोठून येतोस ?
कोठे जातोस ? कोठे राहतोस ?”

“बाळ, मी लांबून येतो, उंचावरून येतो
आणि जमिनीच्या पोटात शिरतो.”

“थेंबा, थेंबा, खरं खरं सांग—
कोठून येतोस, कोठे जातोस ?”

“मी जमिनीवरून वर जातो;
आकाशातून खाली येतो.
खाली नि वर,
वर नि खाली,
येतो नि जातो,
जातो नि येतो.”



“अरे, आकाशातून येतोस,
हे तर खरं आहे;
पण खालून वर जातोस कसा ?”

“उन्हाळ्यात फार ऊन पडतं ना ?
मग आम्ही खूप खूप तापतो.
वाफ होऊन आम्ही वर जातो.
वर जाऊन खूप खेळतो.
इकडून तिकडे, तिकडून इकडे

धावतो, पळतो.
डोलतो, लोळतो.
मग खाली येतो.
आम्ही नसलो तर,
नद्या, नाले आटतील.
तळी, विहिरी आटतील.
शेते सुकतील. बागा सुकतील.
मग खाल काय ? प्याल काय ?"
"खरंच भाऊ, किती तुझा उपयोग !"



✤ ✤ ✤

अभ्यास :

१. थेंब खालून वर कसा जातो ?
२. थेंब आकाशात काय काय करतात ?
३. थेंब वरून खाली येतात म्हणजे काय होते ?
४. पाऊस पडलाच नाही तर काय होईल ?



# ११. आपला स्वातंत्र्यदिन

पहाट झाली. कोंबडा आरवला. आमच्या विकासवाडीत आज सनई-चौघडयाचा मंजुळ आवाज ऐकू येऊ लागला. नंतर भूपाळ्या सुरू झाल्या. भूपाळ्यांचा गोड आवाज साऱ्या गावात घुमू लागला. 'उठा मुलांनो ! उठा बंधूंनो ! उठा भगिनींनो ! आज पंधरा ऑगस्ट ! आपला स्वातंत्र्यदिन ! असेच जणू त्या भूपाळ्या सांगत होत्या.

भूपाळी ऐकताच सर्व जण झेंडावंदनासाठी जायला निघाले. पुढे ते सारे मिळून जयस्तंभाजवळ आपापल्या जागेवर उभे राहिले.

हा जयस्तंभ गावाच्या मध्यभागी होता. स्वातंत्र्याच्या लढयात ज्यांनी बलिदान केले त्यांचे ते स्मारक होते.

झेंडावंदन सकाळी साडेसात वाजता व्हायचे होते. जयस्तंभाजवळची जागा स्वच्छ होती. भोवताली तोरणे बांधली होती. रंगीबेरंगी कागदांच्या पताका लावल्या होत्या. आंब्याच्या डहाळ्या ठिकठिकाणी लटकत होत्या. केळीच्या व नारळीच्या झापांच्या

कमानी पण उभारल्या होत्या. तिथेच ध्वजस्तंभ उभारला होता.

ध्वजस्तंभाजवळ रांगोळ्या काढल्या होत्या. भारताचा सुंदर नकाशा काढला होता. त्यात लाल किल्ल्यावर तिरंगी झेंडा फडकत आहे, असे दिसत होते. भारतीय जनता त्याला वंदन करत होती. हा देखावा फारच सुंदर दिसत होता.

साडेसात झाले. जयस्तंभाजवळचा चौक माणसांनी फुलून गेला. सर्व स्त्रीपुरुष ठरलेल्या ठिकाणी उभे राहिले. शाळेतील मुले नेमून दिलेल्या जागी उभी राहिली. त्यांच्या रेखीव रांगा शोभून दिसू लागल्या. इतक्यात मुख्य गुरुजी आले. त्यांच्या हस्ते झेंडा उभारला गेला. आकाशात तिरंगी झेंडा डौलाने फडकू लागला. सर्वांनी त्याला एकसाथ 'नमस्ते' करताच एका आवाजात, एका सुरात, एका तालात सगळेजण राष्ट्रगीत म्हणू लागले. राष्ट्रगीताचे मधुर सूर वाऱ्याबरोबर दूर दूर पसरू लागले.

राष्ट्रगीत संपले. गुरुजींनी घोषणा दिल्या. 'भारतमाता की जय! महात्मा गांधी की जय!' अनेक मुखांतून त्या घोषणांचा आवाज सर्वत्र घुमू लागला.

* * *

**अभ्यास :**

१. जयस्तंभाजवळ झेंडावंदनासाठी कोणती तयारी केली होती?
२. कोणता देखावा फारच सुंदर दिसत होता?
३. राष्ट्रगीतानंतर गुरुजींनी कोणत्या घोषणा दिल्या?
४. तिरंगी झेंड्याचे तीन रंग कोणते? ते कोणत्या क्रमाने असतात?
५. आपल्या तिरंगी झेंड्याचे चित्र काढा.

# १२. आरसा रडला—आरसा हसला !

सकाळचे सात वाजले तरी दिलीप अजून अंथरुणातच लोळत होता. आई सारखी हाक मारत होती, "दिलीप, ऊठ बाळ. शाळेत नाही का जायचं ?"

पण हूं की चूं न करता दिलीप झोपूनच राहिला होता. शेवटी आईने येऊन त्याचे पांघरूण ओढले. बळेबळेच दिलीपला उठवले.

दिलीप कुरकुरत उठला. कसेबसे तोंड धुतले. त्याने कपडे केले. तो शाळेत जायला निघाला. जाता जाता सहज म्हणून जिन्या-जवळच्या आरशात त्याने डोकावले. तो काय चमत्कार ! आरसा चक्क रडायला लागला ! रडता रडता म्हणाला, "दिलीप ! काय रे तुझं हे ध्यान ! मी कसा स्वच्छ आणि सुंदर. पण तुझ्या या अजागळ रूपानं माझं निर्मळ अंगदेखील घाणेरडं करून टाकलंस. बघ तरी आपलं रूप एकदा !"



दिलीप आपले रूप आरशात पाहू लागला. डोळ्यांची घाण तशीच होती. नाकाला काळे लागलेले होते. डोक्यावरचे केस विसकटलेले होते. दोन्ही हात शाईने बरबटलेले होते. सदरा चड्डी मळली होती. गुंड्या तुटल्या होत्या. वहाणेचा अंगठा लोंबत होता.

आरसा रडत रडत म्हणाला, "पाहिलंस तू तुझं रूप? स्वतः आळशी, घाणेरडा, अजागळ मुलगा आहेस तो आहेसच; पण वर आणखी मलाही मळवून टाकलंस."

आरशाचे बोलणे ऐकून दिलीप ओशाळला. चटकन् आरशापुढून माघारी वळला. त्याने पटकन् आंघोळ केली. कपडे बदलले. केस व्यवस्थित केले. वहाणेचा अंगठा शिवून आणला. नीटनेटका होऊन तो आरशापुढे उभा राहिला. त्याला पाहताच आरसा हसला व म्हणाला, "दिलीप, अशा निर्मळ रूपाचं प्रतिबिंब दाखवायला मला किती किती आनंद होतो म्हणून सांगू! अरे, असाच नीटनेटका, निर्मळ राहा. आळस टाक. लवकर उठत जा. आपलं काम आपणच करावं. प्रत्येक कामात आईची मदत हवी कशाला? आता तू काही लहान नाहीस. सूर्य, चंद्र, पशुपक्षी हे सगळे कसे वेळेवर उठतात. वेळेवर झोपतात. आपलं काम वेळच्या वेळी करतात. धांदल नाही. गडबड नाही. आदळआपट नाही. अस्वच्छता नाही. सगळं कसं लख्ख!"

दिलीप म्हणाला, "मीदेखील आजपासून असाच वागेन.



स्वच्छता, टापटीप ठेवीन. लोकांनी नावं ठेवावीत, नाकं मुरडावीत असं काही करणार नाही."

"शाब्बास!" आरसा म्हणाला, आणि कौतुकाने हसू लागला.

❖ ❖ ❖

अभ्यास :

१. दिलीपला आपली कोणती रूपे आरशात दिसली ?
२. दोन्ही वेळेला आरसा त्याला काय म्हणाला ?
३. दिलीपने कोणता निश्चय केला ?
४. पुढील शब्दांच्या उलट अर्थाचे शब्द दया :
(१) आळशी (२) घाणेरडा (३) अव्यवस्थित (४) रडका.



## १३. पाऊस

पावसाच्या धारा
येती झरझरा
झाकळले नभ, सोसाट्याचा वारा.
रस्त्याने ओहळ
जाती खळखळ
जागजागी खाचांमध्ये तुडुंबले जळ.
झोंबे अंगा वारे
काया थरथरे
घरट्यांत घुसूनिया बसली पाखरे.
हर्षलासे फार
नाचे वनी मोर
पानांतून हळू पाहे डोकावून खार.

पावसाच्या धारा
डोईवरी मारा
झाडाचिया तळी गुरे शोधिती निवारा.
नदीलाही पूर
लोटला अपार
फोफावत धावे जणू नागीणच थोर.
झाडांची पालवी
चित्ताला मोहवी
पानोपानी खुलतसे रंगदार छबी.
पावसात न्हाली
धरणी हासली
देवाजीच्या करणीने मनी संतोषली.



❖ ❖ ❖

छबी–शोभा

**अभ्यास :**

१. पाऊस पडत असताना पशुपक्षी काय करीत होते ?
२. या कवितेत वर्णन केलेल्या देखाव्यांची चित्रे काढावयाची आहेत कोणकोणती चित्रे काढावी लागतील ?
३. पुढे दिलेले शब्द वापरून खालील रिकाम्या जागा भरा :
सोसाट्याने, फोफावत, खळखळ.
(अ) ओहळ········वाहतो. (आ) पूर आला म्हणजे नदी········धावते
(इ) वारा········वाहतो.
४. नदीला नागीण का म्हटले आहे ? जमीन हसली म्हणजे काय झाले ?




# १४. साहसी निर्मल

गंगेच्या काठी हुगळी नावाचे एक गाव आहे. तेथे घडलेला हा प्रसंग. २४ जून १९६४ ची हकीकत. निर्मल व त्याचे मित्र गंगेच्या काठी खेळत होते. काठाला जवळच एक नाव बांधलेली होती. त्या नावेवर ते सगळे चढले. नाव पाण्यावर डुलत होती. मुले खेळण्यात गुंग झाली होती.

आणि एकाएकी काय झाले, काळे काळे ढग आकाशात गर्दी करू लागले. लगेच सोसाट्याचा वारा सुटला. गंगेच्या लाटा उसळू लागल्या. 'तुफान! तुफान!!' सारी मुले ओरडली. मुलांना नावेवर खेळायची अधिकच मौज वाटू लागली.

पण तुफानाचा वेग वाढला. नावेला मोठमोठे हेलकावे बसू लागले. कोणाला तोल सांभाळता येईना. किनारा आता दूर वाटत होता. नावेतून किनाऱ्यावर उडी पण कोणाला मारता येईना. सारी मुले भ्याली. त्यांच्यात एक सात-आठ वर्षांचा मुलगा होता. भीतीने त्याचे पाय लटलट कापत होते.

इतक्यात खूप जोराचा वारा आला. तो छोटासा मुलगा नदीच्या पाण्यात फेकला गेला. तो पाण्यात वाहत चालला. हे काही जणांनी पाहिले. पण त्याला वाचवणार कोण? मोठी मुले देखील नुसतीच पाहत राहिली.

आणि दुसऱ्याच क्षणी निर्मलकुमारने मुलाच्या रोखाने उडी ठोकली. सप् सप् पाणी कापत तो मुलाकडे जाऊ लागला. केवढे अचाट साहस !

लाटा त्याला अडवत. दूर फेकत. पण त्यांनाही त्याने जुमानले नाही. त्याला फक्त तो मुलगा दिसत होता. लाटा त्याला खालीवर लोटत होत्या. क्षणाक्षणाला दोघांतले अंतर कमी कमी होत होते. अखेर त्याने मुलाला गाठले.



त्या मुलाला किनाऱ्यावर आणणे सोपे नव्हते. त्या लाटा, पाण्यातले ते भोवरे त्यांना अडवणारच. त्यातून बुडत्या मुलाने निर्मलला मिठी मारली. पण निर्मलने धीर सोडला नाही. तशाही स्थितीत त्याने त्या मुलाला तीरावर आणले.

त्या मुलाचा जीव वाचला तो निर्मलच्या साहसाने ! किती अचाट साहस !

✤ ✤ ✤

**अभ्यास :**

१. हा प्रसंग कोणत्या गावी घडला ?

२. मुले नावेत खेळत असताना एकाएकी काय घडले ?

३. निर्मलकुमारने कोणते अचाट साहस केले ?

## १५. आमचा वर्ग नेहमी पहिला !

मागच्या वर्षी आमची परीक्षा झाली. आम्ही सारे दुसरीत आलो. आमच्यापैकी एकही मुलगा पहिलीत राहिला नाही.

इतर वर्गात थोडीतरी मुले खाली राहिली. आमचा वर्ग सगळाच दुसरीत आला.

आम्ही सारे वेळेवर शाळेत येतो. अभ्यासात आम्ही एक-मेकांना मदत करतो. खेळायच्या वेळी खेळतो. म्हणून तर आमचा वर्ग परीक्षेत नेहमी पहिला !

एकदा सगळी मुले सहलीला गेली. प्रत्येक वर्गाचा गट निराळा होता. पण सर्व गटांची कामे सारखीच.

सर्वांनी वेळेवर जमायचे. स्वच्छ पोशाख करायचा. वही, पेन्सिल आणायची. फराळाचा डबा बरोबर घ्यायचा. गाणी म्हणत शिस्तीने सहलीला जायचे. आमच्या वर्गातील सर्व मुले वेळेवर हजर होती.

सर्वांची तयारी उत्तम होती. सर्वांनी सहलीत कामे केली. एकमेकांना मदत केली. खूप ग़मती पाहिल्या. वहीत माहिती लिहून ठेवली. सगळा दिवस मजेत गेला.

संध्याकाळी सगळे वर्ग शाळेत परत आले. सगळी मुले एकत्र जमली. मुख्य गुरुजी आले. ते म्हणाले, "आजची आपली सहल चांगली झाली. सर्व वर्गांत दुसरीची शिस्त छान होती."

आमचा वर्ग नेहमीच पहिला !

एक दिवस मुख्य गुरुजी म्हणाले, "दर आठवड्यास तुम्ही आपला वर्ग स्वच्छ करताच. उद्या सुटी आहे. कोणता वर्ग स्वच्छतेत पहिला येतो, पाहू या."

दुसऱ्या दिवशी सकाळी मुले लवकर शाळेत आली. आपापला वर्ग साफ करू लागली.

आम्ही काय काय केले, सांगू?

पहिल्याने वर्ग झाडला. मग ओटा झाडला. भिंती साफ झाडल्या. जळमटे काढली. फरशी पाण्याने धुऊन काढली. कचऱ्याची टोपली साफ केली. फळा नीट ठेवला. चित्रे नीट लावली, नंतर आम्ही पहिलीतील लहान मुलांनाही त्यांचा वर्ग साफ करायला मदत केली. शाळेच्या आवारात पालापाचोळा पडला होता. तो उचलून आम्ही आवार स्वच्छ केले. बाकीच्या मुलांनीही मदत केली.



आम्ही हातपाय धुतले. वर्गात रांगा करून शिस्तीने बसलो.

दुसरे वर्ग पाहून झाल्यावर मुख्य गुरुजी आमच्या वर्गात आले. आम्ही सारे एकदम उठलो आणि त्यांना नमस्कार केला.

गुरुजी म्हणाले, "नमस्कार, बसा. वा! तुमचा वर्ग फारच नमुनेदार आहे. स्वच्छतेचं बक्षीस तुमच्या वर्गाला!"

आमचा वर्ग नेहमी पहिला!



✤ ✤ ✤

**अभ्यास :**

१. दुसरीचा वर्ग कोणकोणत्या कामांत पहिला आला ?

२. खाली दिलेल्या ओळीतील रिकाम्या जागी 'आणि, परंतु' यांपैकी योग्य शब्द लिहा :

(अ) आम्ही ओटा झाडला ......... भिंती झाडल्या.

(आ) फळा नीट केला ......... चित्रेही नीट लावली.

(इ) आवार स्वच्छ केले ......... रस्ता झाडला नाही.

३. आपले घर स्वच्छ ठेवण्यासाठी तुम्ही काय काय करता ?

# १६. मी आहे वीज !

मी वीज आहे. मी चंदूच्या गावाला आले. चंदूला फार फार आनंद झाला. तो दिव्यांची बटणे सारखी खालीवर करीत होता. दिवा लावणे व विझवणे हा जणू त्याचा खेळच झाला होता.

मला गंमत वाटली. मी म्हटले, " चंदू ! मी कोठून आले, ओळख."

चंदू म्हणाला, " तू कोयनेहून आलीस. तू कोयनेची वीज आहेस."



मी म्हटले, " मी एकट्या कोयनेचीच नाही. ढगांतली वीज ती मीच. तू बॅटरी लावतोस ना, त्या बॅटरीतली वीज ती मीच. अरे, तुला आवडणाऱ्या मोराच्या पिसांतली वीज तीही मीच."

चंदू म्हणाला, " शक्यच नाही."

मी म्हटले, " पुष्कळ रूपं घेते मी, चंदू ! मी चपळही आहे. एका क्षणात मी पृथ्वीच्या टोकाला जाते. माझं बळ मोठं आहे. मला हजार हात आहेत. एका हातानं मी दिवे पेटवते; उजेडच उजेड होतो. दुसऱ्या हातानं मी रेडिओ लावते; दूरदूरची गाणी ऐकायला मिळतात. तिसऱ्या हातानं मी पंखे फिरवते; उकाडा नाहीसा होतो. चौथ्या हातानं मी घड्याळाचे काटे फिरवते;

   

तुम्हांला शाळेची वेळ कळते. पाचव्या हातानं मी विहिरीचं पाणी ओढते; शेतं हिरवीगार होतात. सहाव्या हातानं मी आगगाडी चालवते; तुम्हांला सहलींना जाता येतं. सातव्या हातानं मी गिरण्या चालवते; सगळ्यांना कापड मिळतं."

चंदू म्हणाला, "अबब! किती ही तुझी कामं!"

मी म्हटले, "पण चंदू! एके काळी मला कोणी ओळखत नव्हतं. मी आकाशातून कडकडत पडू लागले, की सगळे भीत. आपल्या देशात भारद्वाज नावाचा मुनी होता. त्यानं मला पहिल्यांदा ओळखलं. एकदा त्यानं पीतांबर झटकला; तेव्हा त्यातून मी तडतडत धावले. म्हणून मला तो 'तडित' म्हणू लागला. तडित म्हणजेच वीज.

"पण नंतर लोक मला विसरले. पुष्कळ वर्षं गेली. बेंजामिन फ्रँकलिन नावाचा एक माणूस होता. एकदा त्यानं पावसात पतंग उडवला. पतंगाच्या दोऱ्यातून मी खाली आले. त्याच्या हाताला धक्का दिला. त्यानं माझी शक्ती इतरांना सांगितली. मग लोकांनी माझे वेगवेगळे उपयोग शोधून काढले. आता

सर्वांना मी हवीहवीशी वाटू लागले. माझ्यासाठी नदीला धरण बांधली. धरणावर माझे कारखाने उभारले. आपल्याकडंही कोयनेला मोठ्ठा कारखाना झाला; तो माझ्यासाठीच. तुम्ही कोयनेची वीज म्हणता ना, ती मीच !"

चंदूशी मी बोलत होते. इतक्यात ढग गडगडले. चंदूची गंमत करायला मी पटकन् दिव्यातून निघून गेले. अंधार होताच चंदू घाबरून ओरडला, "ए ! तू कुठं गेलीस ?"

मी लख्खकन् परत आले. चंदू टाळ्या पिटीत ओरडला—

"वीज आली ! वीज आली !"





**अभ्यास :**

१. वीज कोणकोणती कामे करते ?
२. विजेला पहिल्यांदा कोणी ओळखले ? त्यांनी तिला काय नाव दिले ? का ?
३. विजेच्या शक्तीबद्दल लोकांना प्रथम कोणी माहिती दिली ?

# १७. गालबोट



माझ्या छकुलीचे डोळे
दुध्या कवडीचे डाव
बाई कमळ कमळ
गोड चिडीचं ग नाव !

जरि बोलते ही मैना
माझी अजून बोबडे
मला लागती ते बाई
खडीसाखरेचे खडे !

सर्‍या जगाचं कौतुक
इच्या झाकल्या मुठीत
कुठे ठेवू ही साळुंकी
माझ्या डोळ्यांच्या पिंजर्‍यात !

कसे हासले ग खुदकन्
माझ्या बाईचे हे ओठ
नजर होईल कोणाची
लावू द्या ग गालबोट !



डाव — पृष्ठभाग घासल्यानंतर जिच्यावर बुबुळासारखा काळा ठिपका उमटतो अशी कवडी.

**अभ्यास :**

१. छकुलीला गालबोट कशासाठी लावायचे होते ?

२. पुढील रिकाम्या जागी कवितेतील योग्य शब्द लिहा :

(अ) माझ्या छकुलीचे ········ दुध्या ········ प्रमाणे आहेत.

(आ) माझ्या छकुलीचे ········ बोलणे म्हणजे ········ खडे.

## १८. संत एकनाथ

गोदावरीच्या काठी पैठण नावाचा एक गाव आहे. तेथे एक थोर संत होऊन गेले. त्यांचे नाव एकनाथमहाराज. ते सर्वांशी सारख्याच प्रेमाने वागत. पशू, पक्षी, माणसे ही सारी देवाचीच लेकरे असे त्यांना वाटत असे.

एकदा महाराज काशीहून गंगेची कावड घेऊन रामेश्वराला जात होते. त्यांचा शिष्य उद्‌धव व इतर मंडळी त्यांच्याबरोबर होती. हे सारे जण मजल दरमजल करीत रामेश्वराजवळ पोहोचले. आता रामेश्वर काही फारसे दूर नव्हते. 'आता नाथ लवकरच रामेश्वरास पोहोचतील. तेथे जाताच रामेश्वराला गंगाजळाने अभिषेक करतील. सगळ्यांची यात्रा पुरी होईल.' या विचाराने त्यांच्या चेहऱ्यावर आनंद दिसत होता.

ते उन्हाळ्याचे दिवस होते. दुपारची वेळ होती. ऊन मी म्हणत होते. आजूबाजूला रखरखीत वाळवंट पसरलेले होते. अशा त्या वाळवंटात एक गाढव तडफडत असलेले नाथांना दिसले. ते तहानेने व्याकूळ झालेले होते. त्या वाळवंटात त्याला पाणी कोठून मिळणार? महाराजांना त्याची दया आली. त्याची तडफड त्यांना पाहवेना. ते लगेच त्याच्याजवळ गेले. त्यांनी खांद्यावरील कावड खाली ठेवली. कावडीतील गंगाजळाने रामेश्वराला ते अभिषेक करणार होते. तेच गंगाजळ त्यांनी त्या तडफडणाऱ्या मुक्या प्राण्याला मोठ्या मायेने पाजले!



गाढवाची तहान भागली. त्याला हुशारी वाटू लागली. ते उठून उभे राहिले. महाराजांना ते पाहून किती समाधान वाटले! त्याच्या पाठीवरून ते प्रेमाने हात फिरवू लागले. हे सारे महाराजांचा शिष्य उद्धव व इतर लोक यांनी पाहिले. ते महाराजांना म्हणाले—

"महाराज, हे हो काय केलंत? आपणांला या गाढवाचा विटाळ झाला! सारं गंगाजळ अपवित्र झालं! आता रामेश्वराला जाण्यात काय अर्थ उरला? अगदी थोडक्यासाठी आपली सारी यात्रा वाया गेली!"

महाराजांच्या बरोबरीची सर्व माणसे नाराज दिसत होती. महाराज मात्र शांत होते. त्यांच्या मुखावर आनंद दिसत होता. ते म्हणाले, "बाबांनो, या मुक्या प्राण्याला तडफडून कसं मरू दयायचं? मग रामेश्वरी जाऊनही आपली यात्रा पुरी कशी झाली असती!"

हे ऐकून एक जण पुढे येऊन धिटाईने म्हणाला, "महाराज, हे असं कसं म्हणता?"

महाराज त्याला समजावत म्हणाले, "बाबा रे, देव सर्वत्र आहे. कोणत्या रूपानं तो आपल्याला भेटेल, हे कुणी सांगावं? या प्राण्याला पाण्याशिवाय मरू दिलं असतं तर ते देवाला तरी आवडलं असतं का? गंगाजळ पाजून आपण त्याला जगवलं, यातच आपली यात्रा सफल झाली!"

असे होते संत एकनाथ महाराज. म्हणूनच संत निळोबाराय म्हणतात—

"धन्य धन्य एकनाथा!
तुमचे चरणी माझा माथा!!"



**अभ्यास :**

१. 'आता रामेश्वराला जाण्यात काय अर्थ उरला?' असे एकनाथ-महाराजांना लोक का म्हणाले?

२. 'यातच आपली यात्रा सफल झाली,' असे एकनाथमहाराज का म्हणाले?

३. पैठण, काशी व रामेश्वर ही तीर्थक्षेत्रे आहेत. अशाच काही तीर्थक्षेत्रांची माहिती मिळवा.

४. भक्त प्रल्हादाची कथा वाचा.



# १९. सर्कस

वसंत आपल्या बाबांबरोबर सर्कस पाहायला गेला होता. खूपच मोठा तंबू उभारला होता. पुष्कळ लोक सर्कस पाहायला आले होते. खेळ सुरू झाला. एक गमतीदार पोशाख केलेला माणूस रिंगणात आला. तो फार ठेंगणा दिसत होता. त्याने रंगीबेरंगी पट्ट्यांचा कोट घातला होता. तो कोलांट उड्या मारत होता. तोंड वेडेवाकडे करत होता. वसंताला सारखे हसू येत होते. त्याने विचारले, "बाबा, कोण हो हा ?"

बाबा म्हणाले, "अरे, हा तर विदूषक !"

नंतर एकचाकी सायकली घेऊन काही मुली आल्या. उंच ताणलेल्या तारांवर त्या सायकली चालवू लागल्या. त्या पडल्या नाहीत की त्यांचा झोकदेखील गेला नाही ! हे पाहून सर्वांनी टाळ्या वाजवल्या.

बँड वाजत होता. त्या तालावर उंच बांधलेल्या झोपाळ्यांवरचे खेळ झाले. मग रिंगणात एक माणूस आला. त्याच्या



हातात एक लांबच लांब चाबूक होता. बाबा म्हणाले, "हा रिंगमास्तर बरं का, वसंता!"



मग तर फारच मजेचा खेळ सुरू झाला. काही घोडे रिंगणात आले. ते वेगाने धावू लागले. काही घोड्यांच्या पाठींवर मुली उभ्या होत्या. विदूषक एका घोड्यावर बसण्याचा प्रयत्न करू लागला. पळत्या घोड्यावरून तो दोनदा पडला. लोक हसले. मग मात्र तो चपळाईने एका घोड्यावर स्वार झाला. भरधाव पळणाऱ्या घोड्याच्या पाठीवर उभा राहून तो गमती करू लागला. ते पाहून लोकांनी टाळ्या वाजवल्या.



घोडे निघून गेले आणि सोंडांनी मुजरा करत हत्ती आले. लाकडी ठोकळ्यांवर पाय ठेवून ते उभे राहू लागले; ओळीने रिंगणात गोल पळू लागले.

इतक्यात एका बाजूने डरकाळ्या ऐकू येऊ लागल्या. वाघ, सिंह उड्या मारत रिंगणातल्या एका उंच पिंजऱ्यात आले. रिंगमास्तर पुढे सरसावला. त्याच्या इशाऱ्याप्रमाणे वाघ व सिंह खेळ करू लागले. कोणी स्टुलांवर बसले; तर कोणी जाळाच्या चक्रातून उडी मारली !

खेळ चालू होता. बँड वाजत होता. वसंत खेळ पाहण्यात दंग झाला होता. खेळ केव्हा संपला, हे कळलेदेखील नाही !

* * *

**अभ्यास :**

१. विदूषकाला पाहून वसंताला हसू का आले ?
२. हत्तींनी कोणते खेळ केले ?
३. शेवटी कोणता खेळ झाला ?
४. विदूषकाच्या गमतीचे वर्णन करा.

# २०. डोळ्याचा भाव

रात्री दहा-अकराची वेळ. शहरात निजानीज झाली होती. दिवसा गर्दीगोंगाटाने गजबजून गेलेले शहर आता शांत होते.

अशा शांत वेळी शहरातील रिकाम्या रस्त्याने एक भिकारी मोठमोठ्याने ओरडत चालला होता—

"देवा, तू मला काही दिलं नाहीस. मला राहायला घर नाही. अंगावर घालायला कपडे नाहीत. भरपूर खायला-प्यायला नाही. देवा, तू माझ्यावर फार अन्याय केला आहेस रे."

त्या गल्लीत एक श्रीमंत माणूस राहत होता. लांडीलबाडी न करता सचोटीने व्यापारधंदा करून त्याने पुष्कळ पैसे मिळवले होते. या वेळी तो एका नामांकित गवयाचे गाणे ऐकत आपल्या दिवाणखान्यात बसलेला होता. गाणे छान रंगले होते आणि तशात भिकाऱ्याचे ओरडणे ऐकू आले—

"देवा, तू मला काही काही रे दिलं नाहीस. आनंद होईल अशी एखादी जरी गोष्ट माझ्यापाशी असती तरी मी तक्रार केली नसती; पण देवा, तू मला भिकाऱ्यापेक्षा भिकारी केलं आहेस."

गाण्यात रमलेले त्या श्रीमंत माणसाचे मन ते ओरडणे ऐकून कळवळले. त्याने हात वर करून म्हटले,

"गवईमहाराज, माफ करा. थोडा वेळ गाणं थांबवा!" आणि त्याने आपल्या नोकराला रस्त्यावर पाठवले. नोकर

भिकाऱ्याला थांबवून म्हणाला, "आमचं धनी तुला वर बोलावत आहेत. जरा वर चल."

भिकारी थोडा घाबरला. असे बोलावणे त्याला कधी आले नव्हते. त्याला वाटले, हे मोठे घर कोणा मोठ्या अधिकाऱ्याचे असेल. आपल्या ओरडण्यामुळे त्यांना राग आला असेल. काय होईल ? फार तर रट्टे मिळतील. हळू आवाजात ओरड अशी ताकीद मिळेल.

मग तो भिकारी त्या श्रीमंतापुढे जाऊन उभा राहिला. श्रीमंताने त्याला विचारले, "बाबा रे, तू रस्त्यानं काय ओरडत चालला होतास ?"

"महाराज, मी तुमचं नाव नाही घेतलं. मी आपला देवाच्या नावानं ओरडत होतो."

"का बरं ? देवानं असं तुझं काय वाईट केलंय ?"

"महाराज, देवानं मला काही दिलं नाही. तुमच्यासारखा मोठा वाडा नाहीच; पण साधं घरसुद्धा नाही. तुमच्यासारखे रेशमी कपडे तर नाहीतच, पण अंग झाकण्यापुरते कपडेही त्यानं मला दिले नाहीत."

श्रीमंताने विचारले, "तुला पैशाची गरज आहे का ?"

"पैसे मिळाले तर यांपैकी काही गोष्टी मी विकत घेईन."

"मी पैसे देईन, त्याबद्दल तू तुझी काही वस्तू मला दिली पाहिजेस."



भिकारी म्हणाला, "सावकार, माझी गरिबाची चेष्टा करताय? तुम्हांला द्यावं असं माझ्यापाशी काय आहे?"

श्रीमंत म्हणाले, "मला तुझा एक डोळा पाहिजे. देशील?"

"डोळा? खुशाल घ्या की!"

"काय किंमत घेणार?"

"शंभर रुपये घेईन!"

"ठीक आहे. दिवाणजी, द्या याला शंभर रुपये."

एकाएकी भिकाऱ्याला वाटले, आपण सांगण्यात काही चूक तर केली नाही ?—तो घाईघाईने म्हणाला, "नाही महाराज. थांबा. मी एक हजार रुपये घेईन. म्हणजे दहा शंभर."

"काही हरकत नाही. दिवाणजी, दहा शंभर द्या."

भिकारी गोंधळला. इतक्या लवकर सौदा ठरतो आहे, तेव्हा आपण फारच कमी किंमत सांगतोय. दहा शंभर ही काही डोळ्याची खरी किंमत नसावी, असे त्याला वाटले.

"महाराज, मी दहा हजार घेईन."

"ठीक आहे. दिवाणजी, याला दहा हजार द्या."

आता मात्र भिकारी फार गोंधळला. बाजारात डोळ्यांचा भाव नक्की काय आहे, हे त्याला कळेना. तो पुन्हा ओरडून म्हणाला, "महाराज, माफ करा. मला एक लाख रुपये म्हणायचं होतं. ते चुकून तोंडातून दहा हजार गेलं."

"काही हरकत नाही. एक लाख घे."

भिकारी गप्प झाला. त्याच्या मनात विचार आला, की एका डोळ्याची किंमत जर एक लाख रुपये. तर काय, दोन डोळे म्हणजे दोन लाख ? दोन कान म्हणजे चार लाख ? एक नाक म्हणजे आणखी एक लाख? मग डोळे, नाक, कान, हात, पाय— या सगळ्या शरीराची किती किंमत असेल ? शिवाय हातापायांचा भाव नक्कीच जास्त असणार. म्हणजे एका एका हाताचे दोन दोन लाख. आणि हे पाय ? हे डोके ? त्याचे किती लाख ?

भिकाऱ्याला हिशेब जमेना. किती लाखांचे हे शरीर आहे, हे त्याला नक्की समजेना. तो शरमला आणि श्रीमंतापुढे वाकून हात जोडून म्हणाला, "महाराज, मी देवाला फुकट दोष दिला. त्यानं मला धट्टंकट्टं शरीर दिलं आहे, म्हणजे पुष्कळ दिलं आहे. माझी ओरड खोटी आहे. क्षमा करा."



**अभ्यास :**

१. भिकारी रस्त्याने काय ओरडत चालला होता ?
२. भिकाऱ्याचे ओरडणे ऐकून श्रीमंत माणसाने काय केले ?
३. आपण देवाला उगाच दोष दिला, असे भिकाऱ्याला केव्हा पटले ?
४. पुढे दिलेल्या शब्दांचे निरनिराळे अर्थ सांगा :
भाव, लाख, नाव.



(४)

## २१. हळूच या हो हळूच या !

हळूच या हो, हळूच या !
गोड सकाळी ऊन पडे
दवबिंदूंचे पडति सडे
हिरव्या पानांतुन वरती
येवोनी फुलल्लो जगती
हृदये अमुची इवलीशी
परि गंधाच्या मधि राशी
हासुन डोलुन
देतो उधळुन
सुगंध या तो सेवाया;
हळूच या; पण हळूच या !

कधि पानांच्या आड दडू
कधि आणू लटकेच रडू
कधि वाऱ्याच्या झोताने
डोलत बसतो गमतीने
तऱ्हेतऱ्हेचे रंग किती
अमुच्या या अंगावरती
निर्मल सुंदर
अमुचे अंतर
या आम्हांला भेटाया;
हळूच या; पण हळूच या!



✤ ✤ ✤

**अभ्यास :**

१. हळूच या, असे कोण म्हणत आहे? कोणाला?
२. त्यांना कशासाठी बोलावीत आहे?
३. फुलांच्या कोणकोणत्या गमती येथे सांगितल्या आहेत?
४. हळूच या, असे फुले का म्हणतात?

# २२. आईची सेवा

मे महिन्याच्या सुटीत मी घरी गेलो होतो. तेव्हा मी इंग्रजी चौथीत होतो. मी घरी गेलो म्हणजे आईला आधार वाटे; कारण ती नेहमी आजारी असे. एक दिवस ताप येई. दुसऱ्या दिवशी तो निघाला, की ती पुन्हा कामाला लागायची. ताप आला की निजायची; ताप निघताच उठायची. यामुळे ती फार अशक्त होती.

मी आलो म्हणजे तिला बरे वाटे. मी तिला पाणी भरण्यास व धुणे धुण्यास मदत करीत असे. अंगणाची झाडलोट करीत असे. रात्री कधीकधी आईला दळायलाही मदत करीत असे. आईचे पाय चेपायचे हा तर सुटीतील माझा नेमच झालेला होता.

एक दिवस बाहेर स्वच्छ चांदणे पडले होते. जेवणीखाणी झाली होती. वडील जेवून बाहेर गेले होते. धाकटे भाऊ झोपी गेले होते. आईचे उष्टेशेण वगैरे झाले. आई म्हणाली, "श्याम, थोडं दळायचं का रे? का तुझे हात दुखत आहेत? संध्याकाळी तू बागेत खणत होतास, हात दुखत असतील तर नको."

मी म्हणालो, "मुळीच हात दुखत नाहीत. जात्याच्या खुंट्याला तुझा व माझा असे दोन्ही हात असतात. तुझा प्रेमळ हात माझ्या हाताला लागून मला शक्ती येते. अंगणात जातं घालू? पोत्यावर जातं घालतो." आईने घाल म्हणून सांगितले.

मी अंगणात जाते घातले. आईने दळण आणले. दुसऱ्या दिवशी आंबोळ्या करायच्या होत्या. मला आंबोळ्या फार



आवडत असत. आम्ही मायलेकरे अंगणात दळत होतो व चंद्र वरून अमृताचा वर्षाव करत होता. थंडगार वारा सुटला होता. आई ओव्या म्हणत होती व त्या ओव्यांत 'श्याम बाळ' असे माझे नाव गुंफत होती. मला आनंद वाटत होता.

दळण्याचे काम मला लहानपणापासून आवडते; कारण त्यामुळे आईची सेवा करता येत असे. आईबरोबर दळत असता मी जात्यात घास घालायलाही शिकलो होतो.

आम्ही दळत होतो. दळण्याचा आवाज ऐकून शेजारच्या जानकीवहिनी आल्या.

"बाई, हे काय? श्याम का दळतो आहे? मी म्हटलं, आज रात्री एकट्या कशा दळत बसल्यात, म्हणून पाहायला आले. श्याम, हे रे काय? तू इंग्रजी शिकतोस ना?" जानकीवहिनी म्हणाल्या.

मी आईला विचारले, "आई, दळायला हात लावला म्हणून काय ग झालं?"

आई म्हणाली, "श्याम, जानकीबाई थट्टा करतात हो तुझी. त्यांचं तुझ्यावर आहे प्रेम, म्हणून पाहावयास आल्या. अरे, काम करणाऱ्याला का कोणी नावं ठेवील? आईला मदत करण्यात रे कसली कोणाची लाज? आईला मदत करणाऱ्याला

हसेल तो रानटीच समजला पाहिजे. जनाबाईबरोबर प्रत्यक्ष पांडुरंग नव्हता का दळायला लागत?"

"हो, खरंच आई, पण खरं असेल का ग ते? देव कबिराचे शेले विणू लागे. जनाबाईचं दळण दळू लागे. धुणी धुऊ लागे. नामदेवाच्या पाठीमागं उभा राहून कीर्तनात टाळ वाजवी, नाचे. खरं का ग हे सारं?" असे मी विचारले.

"बसा ना जानकीबाई, अशा उभ्या का?" असे जानकीबाईस विनवून आई मला म्हणाली, "श्याम, खरंच असेल ते. देवावर ज्यांची श्रद्धा असते व देवाचं स्मरण सदैव मनात ठेवून जे काम करतात, त्यांना देव मदत करतो."

* * *

घास–जात्यात वैरायचे धान्य.

**अभ्यास :**

१. सुटीत श्याम आईला कोणती मदत करीत असे?
२. तुम्ही आईला कोणत्या कामात मदत करता?
३. श्यामला दळताना पाहून जानकीवहिनींना आश्चर्य का वाटले? त्यावर आई काय म्हणाली?
४. गाळलेले शब्द भरा :
(अ) जनाबाई व कबीर हे देवाचे ........ होते.
(आ) कोणतेही काम करण्यात ........... नाही.
(इ) तुझा प्रेमळ हात माझ्या हाताला लागून मला ........... येते.

# २३. स्वावलंबी अपंग



आज पगाराचा दिवस असल्याने सुरेश मोठा खुशीत होता. त्याचे बाबा त्याला आज नवीन पुस्तके आणून देणार होते. बाबा घरी कधी येतात आणि आपण कधी बाजारात जातो, असे त्याला झाले होते.

कारखान्यातून परत आल्यावर सुरेशच्या बाबांनी सुरेशला बाजारपेठेत नेले. बाजारपेठेत कितीतरी मोठमोठी दुकाने होती. त्यांच्या भल्यामोठ्या पाट्या आणि तेथील दिव्यांचा झगमगाट पाहून तर सुरेशचे डोळे दिपून गेले. पुस्तके विकत घेणाऱ्या मुलामुलींची त्या दुकानात एकच झुंबड उडाली होती.

सुरेशचे बाबा त्या दुकानात गेले नाहीत. मोठा चौक ओलांडून गल्लीतील एका लहानशा दुकानात ते शिरले. दुकानदाराने त्यांना एकाच हाताने नमस्कार केला; कारण त्याचा दुसरा हात तुटलेला होता. सुरेशच्या बाबांनी दुकानदाराला पुस्तकांची यादी दिली, तेव्हा त्याने आत जाऊन पुस्तके शोधण्यास सुरुवात केली. तो एकाच हाताने पुस्तके शोधून काढत होता. त्यामुळे ती शोधायला त्याला थोडा उशीर होऊ लागला. सुरेशच्या रागाचा पारा चढू लागला. नवीन पुस्तके आणि त्यांतील चित्रे पाहावयाला तो अत्यंत उत्सुक झाला होता.

दुकानदाराने एकाच हाताने पुस्तके आणून सुरेशच्या पुढ्यात

ठेवली. बाबांनी आपल्या हाताने पुस्तकांचा गठ्ठा बांधून घेतला. दुकानदाराला पैसे देऊन ते दोघे जण दुकानातून बाहेर पडले. दुकानदाराने पुन्हा हसत हसत एका हाताने सुरेशच्या वडिलांना नमस्कार केला.

सुरेशने रागाने विचारले, "बाबा, मोठमोठी दुकाने सोडून तुम्ही याच दुकानातून पुस्तके का घेतली हो? तो दुकानदार थोटा असल्याने पुस्तके दयायला सुद्धा त्याने किती उशीर लावला...."

"सुरेश, मी मुद्दामच त्या दुकानदाराकडून पुस्तकं घेतली."

"का बरं?"

"तू पाहिलं नाहीस, तो एकाच हातानं काम करत होता ते? त्याला पूर्वी आपल्यासारखेच दोन हात होते; पण तो एका अपघातात सापडल्यानं त्याचा एक हात कापावा लागला. तरीही तो निराश झाला नाही. त्यानं पुस्तकं विकण्याचा धंदा सुरू केला."

"पण बाबा," सुरेश म्हणाला, "त्याला दुसरा हात नसल्यानं पुस्तकंही नीट बांधता येत नव्हती. दुसरं कोणी मदत नाही का करणार?"

"छे छे! त्याला हे मुळीच आवडणार नाही. अंगी कष्ट करण्याची शक्ती असताना दुसऱ्यावर अवलंबून का राहावं? म्हणून तर हा दुकानदार थोटा असूनही पुस्तकं विकण्याचा धंदा करतो आहे. तो आपला भार कुणावरही टाकत नाही. कष्ट करून मिळवण्यात त्याला किती समाधान वाटत असेल! यासाठीच तर आपण या दुकानातून पुस्तकं विकत घेतली. आपलंही काम झालं आणि

त्याच्या श्रमाचंही चीज झालं."

वाटेने चालत असताना सुरेश मनातल्या मनात त्या दुकानदाराचाच विचार करत होता. मध्येच तो बाबांना म्हणाला, "बाबा, या दुकानदारासारखे इतरही अपंग लोक असतील, नाही? ज्यांना असं दुकान थाटता आलं नसेल, त्यांचे किती हाल होत असतील?...."

सुरेशचे बाबा म्हणाले, "नाही, सुरेश हे लोक शिकले आणि काम करू लागले तर ते इतरांसारखंच आनंदानं राहतील. आपल्या गावातच अशा लोकांसाठी निरनिराळी कामं शिकवण्याची सोय आहे."

सुरेशने आश्चर्याने विचारले, "पण अशा लुळ्यापांगळ्या लोकांना कामं तरी कोणती शिकवणार?"

ते म्हणाले, "अरे, कितीतरी कामं आहेत. छपाईची यंत्रं फिरवणं आहे, विणकाम आहे, भरतकाम आहे, रंग देणं आहे आणि हेच काय, अरे, काही अपंग तर पायाच्या बोटांत कुंचला धरून चित्रंही काढतात!"

"खरंच का हो बाबा, तर मग आपण एकदा त्यांची शाळा पाहायला जाऊ या."

* * *

**अभ्यास :**

१. सुरेशच्या वडिलांनी त्याच दुकानातून पुस्तके का घेतली?
२. त्या दुकानदाराला खरे समाधान कशात वाटत होते? का?
३. पुढील शब्दांचे अर्थ समजावून घ्या : अपंग, झुंबड, निराशा, कष्ट, थोटा.

## २४. चतुर बिरबल

एकदा शिवराम नावाचा एक गवळी आपली गाय घेऊन बाजारात निघाला. वाटेत त्याला त्याच्च गावचा शंकर नावाचा गवळी भेटला. दोघेही गप्पा मारीत बाजारात गेले. तेथे शंकरच्या मनात आले कपट. त्याने दांडगाईने शिवरामची गाय आपल्या ताब्यात घेतली आणि ती आपलीच्च म्हणून तो तिला बाजारात विकायला नेऊ लागला. शिवराम ऐकेना. तेव्हा शंकरने त्याला खूप मारले आणि बळजबरीने गाय घेऊन तो बाजारात गेला.

बिचारा शिवराम शहरात आला आणि त्याने बादशहाकडे तक्रार नेली. बादशहाने ते प्रकरण बिरबलाकडे सोपवले. बिरबलाने सर्व हकीकत ऐकून घेतली. शिपायाला पाठवून शंकरला गाय घेऊन दुसऱ्या दिवशी दरबारात येण्यास सांगितले.

दुसऱ्या दिवशी दोघेही दरबारात आल्यावर बिरबलाने शंकरला विचारले,"काय रे, ही गाय कुणाची ?"

तो म्हणाला, "सरकार, ही गाय माझी आहे. हा माझ्यावर उगाच्च चोरीचा आळ घेत आहे."

ते ऐकून बिरबलाने शिवरामला गाईचे नाव विचारले. त्याने हरिणी असे तिचे नाव सांगितले. त्यावर बिरबल म्हणाला, "तुम्ही आता पन्नास पावलं दूर जाऊन उभं रहा आणि दोघेही 'हरिणी' म्हणून या गाईला हाका मारा."

त्याप्रमाणे ते दोघे पन्नास पावले दूर गेले. दोघांनीही गाईला



हाक मारली. त्याबरोबर ती गाय सरळ शिवरामच्या जवळ येऊन उभी राहिली व त्याच्या अंगाला आपले अंग घासू लागली.

ते पाहून बिरबलाला खरा मालक कोण व चोर कोण, ते समजले. तरी आणखी खात्री करण्याकरता तो त्यांना म्हणाला, "आता तुम्ही दोघं पाठ फिरवून सरळ चालू लागा, एक उजव्या बाजूनं आणि दुसरा डाव्या बाजूनं."

त्याप्रमाणे ते दोघे चालू लागताच गाय सरळ शिवरामच्या मागोमाग चालू लागली.

ते पाहिल्याबरोबर बिरबलाने शंकरला दरडावून विचारले, "काय रे, तू दुसऱ्याची गाय घेऊन वर खोटं बोलतोस ?"

शंकर काय बोलणार ? त्याने मुकाट्याने गुन्हा कबूल केला. बिरबलाने शिवरामला त्याची गाय घेऊन जाण्यास सांगितले आणि शंकरला शिक्षा केली.

* * *

**अभ्यास :**

१. शंकरने शिवरामला का मारले ? २. शिवराम बादशहाकडे का गेला ?
३. गाईचा मालक कोण, हे बिरबलाने कसे ठरवले ? ४. गावात गुन्हा घडल्यास आज आपण तक्रार कोणाकडे करावी ?

# २५. मामाची रंगीत गाडी

माझ्या मामाची रंगीत गाडी हो
तिला खिल्लाऱ्या बैलांची जोडी हो !
कशी दौडत दौडत येई हो
मला आजोळी घेऊन जाई हो
नाही बिकट घाट
सारी सपाट वाट
मऊ गालीचे ठायीठायी हो !



शीळ घालून मंजूळवाणी हो
पाजी बैलांना ओहळ पाणी हो
गळा खुळखूळ घुंगूरमाळा हो
गाई किलबील विहंगमेळा हो !
बाजरिच्या शेतात
करी सळसळ वात
कशी घुमवी आंबेराई हो !

कोण कानोसा घेऊन पाही हो
कोण लगबग धावून येई हो
गहिवरून धरून पोटी हो
माझे आजोबा चुंबन घेती हो !
लेक एकूलती
नातु एकूलता
किति कौतूक कौतूक होई हो !



✤ ✤ ✤

**अभ्यास :**

१. आजोळी जाताना वाटेवर कोणकोणते देखावे दिसले ?
२. 'पाजी बैलांना ओहळ पाणी' म्हणजे काय ?
३. या कवितेतील आवाजांचे वर्णन करणारे शब्द शोधून काढा. ते आवाज कोणाकोणाचे आहेत ?
४. आजोबांनी आपल्या नातवाचे कौतुक कशा रीतीने केले ?



## २६. आमची वर्धामाय

आमच्या नदीचे खरे नाव वर्धा. पण तिला कोणी या नावाने ओळखत नाही. घरी किंवा गावात मोठी माणसे असतात. त्यांची

नावे वेगळी असतात. पण त्यांना आदराने काका म्हणतात; बाबा म्हणतात. आम्हीही आमच्या वर्धेला गंगा म्हणतो. नदीला आपण आई मानतो; म्हणून ती आमची वर्धामाय किंवा गंगामाय.

बैतूल जिल्हयातील डोंगरात वर्धा उगम पावते. वर्धा जिल्हयाच्या पश्चिम सरहद्दीवरून ती वाहात जाते. ती जिल्हयाला पाणी व गाळाची जमीन देते म्हणून तिला वरदा म्हणतात. वरदा म्हणजे वर देणारी. वरदाऐवजी तिचे नाव वर्धा झाले.

वर्धामाय गंगेइतकी मोठी नाही. पण ती आमची आवडती आहे ना! म्हणून ती आम्हांला गंगेएवढीच थोर वाटते. गंगेत आंघोळ केल्याने पुण्य लाभते. आमच्या गावचे वामनशास्त्री तर सांगतात की, आपल्या गावाच्या ओढ्यात आंघोळ केली तरी गंगास्नानाचे पुण्य मिळते. मनात आदरभाव ठेवावा म्हणजे लहान वस्तूही मोठी होते. ओढाही गंगेएवढा मोठा ठरतो.

आम्ही आमच्या वर्धामायला गंगामाय म्हणतो. आई आपल्याला आंघोळ घालते. मग आपण नीटनेटके दिसतो. वर्धामाय सर्वांना आंघोळ घालते. आम्ही सर्व गावकरी तिची लेकरे आहोत. कोणी लहान येवो, मोठा येवो, सर्वांना ती आंघोळ घालते. सर्वांनाच चवदार, गार, स्वच्छ पाणी देते. तिच्या पाण्यामुळे आमची शेती पिकते. साऱ्या गावाला ती पोसते. आईच की नाही मग ती!

वर्धेच्या तीरावर कौंडिण्यपूर, कापशी, कोटेश्वर ही तीर्थक्षेत्रे

आहेत. कापडाच्या गिरण्यांचे गाव पुलगाव हेही तिच्या तीरावर आहे. कोटेश्वर येथे शिवरात्रीला मोठी यात्रा भरते. कापशी येथेही माघ महिन्यात मोठी यात्रा भरते.

मुंबईचा माझा मित्र सुनील माझ्याकडे आला होता. मुंबईच्या सुनीलला आमची वर्धा फारच आवडली. त्याच्या गावाला केवढा थोरला समुद्र आहे! पण तो आहे खारट. तेथे लहान मुलांना पोहण्याची मजाही नाही. वर्धामायची रेती तर त्याला गादीहूनही मऊ मऊ वाटली. वाहत्या धारेत तो खूप डुंबला. खूप खूप पाणी अंगावर घेतले. खूप खूप सभोवती उडवले. तरीही पाणी जेवढेच्या तेवढेच.

ते उन्हाळ्याचे दिवस म्हणून तेथे खरबूज-टरबुजांच्या वाड्या होत्या. अशी मजेदार लज्जतदार फळे! हा नदीचा मेवा. आमच्या गंगामाईचा खाऊ. खूप खूप खा. संपत नाही.

* * *

**अभ्यास :**

१. वर्धा ही गंगेइतकी थोर का वाटते?
२. वर्धेच्या काठी असलेली महत्त्वाची तीर्थक्षेत्रे कोणती?
३. तुमच्या गावी नदी आहे का? नसल्यास नदी पाहण्यासाठी एखादी सहल काढा व तुम्ही पाहिलेल्या नदीचे दहा ओळींत वर्णन करा.

## २७. काळविटाने काय सांगितले?

तरुण जवाहरला शिकारीचा षोक होता. बंदूक घ्यावी, घोड्यावर बसावे, रानातून दौडावे आणि सावज दिसले की ते अचूक टिपावे याची त्याला भारी हौस. उन्हातान्हातून फिरताना अंगातून घाम निथळू लागला की जवाहरला खूप आनंद होई. घरबसेपणा त्याला कधी मानवत नसे.

एक दिवस तो असाच शिकारीला गेला. बरोबर नेहमीचे सवंगडी होते. बंदूक खांद्यावर लटकावलेली होती. दिवस थंडीचे होते. सुरेख गुलाबी थंडी पडली होती. मऊ उबदार उन्हाची मजा वाटत होती. सकाळच्या उन्हात पिकावरील दवाच्या थेंबांचे मोती चमकत होते. सरसूची शेते फुलून पिवळी-धमक झाली होती. जवाहरलाल शेतातून, गवतातून चालला होता. तोंडाने हलकेच शीळ घालीत होता. वर आकाशातून बगळ्यांच्या माळा उडताना दिसत होत्या. पांढरे, ढेरपोटे ढग अलगद तरंगत चालले होते. शेताच्या कुंपणात काही खुजबुजले की जवाहर बारीक नजरेने शोधत होता. ते काय उडाले? तो तर तित्तर पक्षी. तो कोण पळाला? तो तर लांबकान्या ससा. त्यांना कशाला मारायचे, गरीब बिचारे!

आता अलाहाबाद शहर लांब मागे पडले. शेतेही संपत आली. माळरान सुरू झाले. एखादा सरळसोट अर्जुनवृक्ष किंवा चारदोन आंब्याच्या झाडांचा हिरवा पुंजका दिसू लागला. बाकी

सगळे खुरट्या गवताचे सपाट मैदान. मधून मधून पुरुषभर उंचीच्या कुशाच्या गवताची बेटे. जवाहर आता अधीर होऊन झपाझप पावले टाकीत होता. येथे जर शिकार मिळाली नाही तर रिकाम्या हातांनी घरी परतावे लागणार. मग वडील मोतीलाल म्हणतील, 'आज बार फुकट गेलेला दिसतोय.' आई म्हणेल, 'कशाला उन्हातान्हातून वणवण करायची?' धाकटी कृष्णा म्हणेल, 'काय पण दादाची शिकार!'

छे! छे! काही तरी शिकार मिळालीच पाहिजे. त्याशिवाय परतण्याची भाषा नको. बगलेतल्या थैलीतली पाण्याची बाटली जवाहरने तोंडाला लावून अर्धी संपवली. कपाळावरून मानेपर्यंत आलेले घामाचे ओघळ पुसून तो पुढे चालू लागला.

एवढ्यात डाव्या अंगाचे गवत हालले. येथे कोणीतरी जनावर खास आहे! जवाहरलालची बंदुकीवरची पकड घट्ट झाली. तो गवताआडून हळूहळू पुढे सरू लागला. गवत पुन्हा हालले. आता चांगलेच हालले. खसखस झाली आणि गवतामधून एक शिंगाड्या काळवीट बाहेर पडला. काय ऐटदार दिसत होती त्याची शिंगे! त्याचे कान चारी दिशांचा वेध घेताना कसे मागेपुढे होत होते. आपली बाकदार मान उंच करून तो अशा झोकात उभा होता, की सूचना मिळताच चौखूर निघता यावे.

जवाहर होता तेथेच थांबला. तो त्या काळविटाकडे पाहू लागला. काळविटाच्या मागोमाग त्याची मादी बाहेर आली आणि मादीच्या मागोमाग तिचे दोन बछडे. तेही आपल्या बापासारखेच

कानोसा घेण्याचा प्रयत्न करीत होते. ते वारा हुंगत होते. आपल्या शेपट्या लुगूलुगू हालवीत होते. जवाहरच्या समोर एक हरीण कुटुंबच उभे होते. आपल्या घरच्यासारखेच. आईवडील आणि भावंडे. शिकार करावी की सोडून द्यावी? बार टाकावा की बंदूक परत खांद्याला अडकवावी?....जवाहरलाल विचारात पडला.

काळविटाला चाहूल लागली आणि तो सपाट्याने निघाला. चौकड्या भरत, वारा पीत निघाला. पाठोपाठ मादी आणि बछडे. हरणे पळतात की पाखरे उडतात कळेना! आता बार टाकला नाही तर शिकार हातची गमावली, असे होणार होते. जवाहरलालला अधिक विचार करायला वेळच नव्हता. त्याने बंदूक उचलली, नेम धरला आणि चाप ओढला.

ठोऽऽ! बाराचा आवाज रानोमाळ गेला. बंदुकीच्या



नळीवरचा धूर हवेत विरला. जवाहरने पाहिले, चाराऐवजी तीनच हरणे पळताहेत. तो त्यांच्या दिशेने धावत निघाला. बाराचा आवाज ऐकून जवाहरचे मित्रही त्याच्या दिशेने निघाले. पन्नास पावलांवर तो धिप्पाड काळवीट भूमीवर कोसळला होता. त्याच्या बगलेतून रक्ताची धार लागली होती. जवाहर जवळ जाऊन पाहतो तो, शेवटची धाप लागून त्याच्या बगला उडत होत्या. मान लुळी पडली होती. ती ऐटदार शिंगे मातीत पुरली होती. जवाहरने त्याची मान सरळ केली, तेव्हा त्याच्या काळ्याभोर डोळ्यांतून पाणी वाहत होते. त्याचे डोळे जणू जवाहरला म्हणत होते, 'का मारलंस रे मला? मी तुझं काय वाकडं केलं होतं?' दुसऱ्याच क्षणी त्याने डोळे मिटले. ते पुन्हा उघडले नाहीत!

काळविटाचे डोळे जे बोलले ते जवाहरला समजले होते. त्याने बंदूक खोलून उरलेली काडतुसे फेकून दिली. यापुढे शिकार करायची नाही, असे त्याच्या मनाने ठरवले.

जवाहरलालजींनी नंतर कधीच शिकार केली नाही.

* * *

**अभ्यास :**

१. जवाहरला कोणत्या गोष्टीची हौस होती?
२. आपण शिकार न करताच परत फिरलो तर घरची मंडळी काय म्हणतील असे जवाहरला वाटले?
३. जवाहरलालने नंतर कधीच शिकार का केली नाही?
४. उलट अर्थाचे शब्द द्या :
तरुण, खुरटे, पांढरे, वर, लांब, सरळ.

## २८. गावकऱ्यांची शाळा

पिंपळगाव हे एक खेडे आहे. तेथे मुलींची शाळा आहे. शाळेत मुली पुष्कळ आणि इमारत लहान. शाळेत संक्रांतीचा उत्सव होता. मुलींचे खेळ होणार होते. पण खेळायला तर जागा नव्हती.

दुसऱ्या शाळेच्या पटांगणावर खेळ झाले. चटकदार संवाद झाले. मुलींनी गोड गाणी म्हटली. समारंभासाठी बाहेरगावचे मुख्य पाहुणे आले होते. सभेला सगळे गावकरी जमले होते. पाहुणे बोलू लागले:

"खेळ फार छान झाले. सर्वांना आवडले. पण कोणी मुलींची शाळा पाहिली का? जागा किती लहान! किती घाणेरडी! या शाळेत का या चांगल्या मुलींनी जावं? तुम्हांला रोज कसं पाहवतं? तुम्ही उत्तम शेती करता. आपल्या स्वतः-करता काम करता. तसंच शाळेकरता थोडं काम करा. एकेकानं थोडं थोडं काम केलं, तरी शाळेची इमारत तयार होईल."

पांडोबा पाटील उठले. ते म्हणाले, "गड्यांनो, आपण सारे एका जिवाचे, एका शब्दाचे. पाहुणे म्हणतात ते खरं आहे. लागू या कामाला."

दुसऱ्या दिवशी दवंडी झाली. घराघरांतून माणसे आली. घमेली, कुदळी, फावडी घेऊन आली.

खूप माणसे जमली. कोणी गाड्या आणल्या. कोणी बैल आणले. सगळे जण कामाला लागले. ते पाया खोदू लागले.



गाड्या चालू लागल्या. भराभर दगड-विटा आल्या. लाकूड आले. गवंडी व सुतार लगेच कामाला लागले.

असे काम सुरू झाले. दहा दिवस झाले. पाया भरत आला. शाळेच्या नावाचा दगड तयार झाला. पाहुण्यांना बोलावले. त्यांच्या हाताने दगड बसवला. साखर वाटली. सर्वांना आनंद झाला.

वरचे बांधकाम चालू झाले. लवकरच इमारत झाली. गावाने केलेली, गावाच्या मालकीची, सुंदर, दुमजली इमारत. मोठे पटांगण, खूप हवा, खूप उजेड. भिंतींना रंग, जमिनीला फरशी. मोठे मोठे वर्ग. सगळीकडे स्वच्छ! सर्वांना आनंद झाला.

जो त्या गावी जाई, तो म्हणे—"किती छान शाळा! गावकऱ्यांनी स्वतः बांधली. शाबास रे गावकरी!"

गावाचे काम ते सगळ्यांचे काम!

गाव करील ते राव काय करील?

✤ ✤ ✤

अभ्यास :

१. पाहुण्यांनी लोकांना काय सांगितले? २. गावकऱ्यांनी कोणता निश्चय केला? ३. गावकऱ्यांनी शाळा बांधण्यासाठी काय काय केले? ४. आपल्या शाळेसाठी तुम्ही काय कराल?



## २९. माझा भारत!

माझा भारत, माझा भारत!
ऊन, चांदणे झुळझुळ वारा
इथे जळाची पावनधारा
उंच ढगाहुनि इथले पर्वत
माझा भारत, माझा भारत!

अंधारातिल दीपक होई
सुखशांतीची वाट दाखवी
जगा आवडो याची संगत
माझा भारत, माझा भारत !

माया करितो सकळांवरती
देव देतसे याच्या हाती
आपुलकीची अमोल दौलत
माझा भारत, माझा भारत !

मंगल गीते याची गाइन
सेवेसाठी तत्पर राहिन
याच्यापायी वाहिन जीवित
माझा भारत, माझा भारत !

* * *

पावन – पवित्र; दीपक – दिवा; अमोल दौलत – जिची किंमत ठरवता येणार नाही अशी संपत्ती; तत्पर – तयार.

अभ्यास :

१. या कवितेत आपल्या देशाच्या कोणकोणत्या विशेष गोष्टी सांगितल्या आहेत ?
२. अंधारातील दीपक असे कोणाला म्हटले आहे ? का ?
३. कवितेच्या शेवटी देशासाठी करायच्या कोणकोणत्या गोष्टी सांगितल्या आहेत ?

# ३०. पाणीदार मोती

माळरानावर गुरे चरत होती. मेंढयांचा कळपही चरत चरत फिरत होता. गुराखी आणि मेंढपाळ गप्पा मारत उभे होते. इतक्यात एक जण ओरडला, "पळा रे, पळा. ते बघा धुळीचे लोट. लष्कर आलं. पळा. गुरंढोरं बाजूला घ्या. मेंढया पळवा. चला, चला."

ती आरोळी ऐकताच सारी गडबड उडाली. सर्वांनी आपापली गुरेढोरे आणि मेंढरे बाजूला नेली. भीतीने सारे जण दडून बसले. एक तरुण मेंढपाळ मात्र लपला नाही. तो काठी सावरून तेथेच उभा राहिला.

"मल्ल्या, मल्ल्या, अरं ए मल्ल्या, तिथं नगो उभा राहूस. लष्कर जवळ आलंय बघ. घोडयांच्या टापांखाली चेंगरून मरशील." अशा आरोळ्या बाकीच्यांनी दिल्या; पण मल्ल्या बाजूला हटला नाही. पाय रोवून तो तेथेच उभा राहिला.

मल्ल्या रागाने लालभडक झाला होता. त्याचे ओठ थरथरत होते. लष्कर जवळ येताच त्याने हातात एक भले मोठे ढेकूळ घेतले.

घोडेस्वार अगदी जवळ आले. डोक्याला लाल मुंडाशी, हातात भाले, कमरेला तलवारी आणि पाठीवर ढाली अशा थाटात ते स्वार दौडत येत होते. ते पेशव्यांचे सैनिक होते.

आघाडीचा स्वार गोरापान होता. तो अंगाने भरदार होता. त्याच्या डोक्यावर मोत्यांचा शिरपेच होता. त्याचा पांढरा शुभ्र



ऐटदार घोडा जवळ येताच मल्ल्याने नेम धरला आणि हातातील ढेकूळ त्या स्वाराच्या रोखाने जोरात फेकून मारले.

अचानक ढेकूळ अंगावर येताच तो स्वार चमकला. त्याने आपला घोडा जिथल्या तिथे उभा केला. रागाने त्याला विचारले, "कोण रे तू? नाव काय तुझं?"

त्या स्वाराच्या दरडावण्याला मल्ल्या मुळीच भ्याला नाही. किंचितही न डगमगता तो म्हणाला, "मला मल्ल्या म्हणतात!" त्याची ही धिटाई पाहून त्या स्वाराला मोठे नवल वाटले. कौतुकाने तो स्वार त्याच्याकडे पाहतच राहिला त्याने पुन्हा दरडावून विचारले, "तू ढेकूळ का मारलंस?"

न भिता मल्ल्या म्हणाला, "मारणार!"

"म्हणजे?"

"तुम्ही सैनिक लोक आमच्या शेतांतून जाता, बेधडक पिकं तुडवता, पिकांची नासाडी करता; मग का मारू नयेत ढेकळं तुम्हांला?"

मल्ल्याचे हे उत्तर, त्याचा बाणेदारपणा आणि त्याची धिटाई या सगळ्यांची त्या स्वारावर चांगलीच छाप पडली. तो स्वार कोणी साधा स्वार नव्हता. तो स्वार म्हणजे प्रत्यक्ष बाजीराव पेशवेच होते! मल्ल्याला चांगले न्याहाळून ते पुढे निघून गेले.

त्या रात्री त्या सैन्याचा मुक्काम त्याच गावी पडला. दुसऱ्या दिवशी सकाळीच मल्ल्याच्या घरी पेशव्यांचे बोलावणे आले. प्रत्यक्ष पेशव्यांचेच बोलावणे आले म्हणून त्याचा मामाही त्याच्याबरोबर गेला. मल्ल्याने कालचा शेतात घडलेला प्रकार आपल्या मामाला वाटेत सांगितला. त्याचा मामा तर अगदी गांगरून गेला. दोघेही पेशव्यांच्या तंबूत गेले. बाजीराव पेशव्यांपुढे मल्ल्याचा मामा अत्यंत अजिजीने म्हणाला, "सरकार, गुन्हा माफ करा! पोर जरा द्वाड आहे. त्याला आईबाप नाहीत. मीच सांभाळतो."

"कुठला राहणारा हा?" असे बाजीरावांनी विचारले, तेव्हा मामा म्हणाले, "हा होळचा राहणारा."

"ठीक आहे. हा मोठा तेज आहे. याला आता आम्ही संभाळणार! काय मल्हारी, येणार का आमच्या सैन्यात?" असे

बाजीराव पेशव्यांनी विचारले, तेव्हा 'जी' म्हणून त्याने पेशव्यांना लवून मुजरा केला. बाजीरावांनी त्याची पाठ थोपटली.

हुजऱ्याने पोशाख आणला. तो मल्हारीस दिला. मामाचे डोळे ओलावले. बाजीराव पेशवे म्हणाले, "आज आम्हांला खरा पाणीदार मोती सापडला!"

हाच मल्ल्या पुढे मल्हारराव होळकर झाला!



✤ ✤ ✤

**अभ्यास :**

१. मल्ल्याने स्वाराला ढेकूळ का मारले?
२. आघाडीच्या स्वाराचे आणि त्याचे काय बोलणे झाले?
३. दुसऱ्या दिवशी मल्ल्याला कोणी बोलावले? का?
४. त्याला पेशव्यांनी 'पाणीदार मोती' का म्हटले?
५. पुढील शब्दांचा अर्थ समजावून घ्या :
माळरान, लष्कर, आघाडी, पाणीदार.

# ३१. बाजी प्रभूचे बलिदान

(स्थळ–विशाळगडची वाट. वाटेवरील पांढऱ्या पाण्याचा झरा. शिवाजीमहाराज निवडक सैन्यासह गडाकडे चालले आहेत.)

शिवाजी : बरीच मजल मारली. पांढऱ्या पाण्यावर तर येऊन पोहोचलो. आता काय विशाळगड सारा तीन कोस. आता जाऊ चला, तांबडे फुटले. दिशा उजळू लागल्या. पाण्यावर तोंड धुऊ व थोडी विश्रांती घेऊ. मध्यरात्री पन्हाळा सोडल्यापासून विसावा नाही. बाजी, खिंडीतून कुणाला वर पाठवा आणि पाठीमागे गनीम कोठपर्यंत येऊन ठेपला आहे, ते हेरण्यास सांगा. (बाजी प्रभू जातो.)

एक सरदार : आपण निसटल्याचे कळल्यावर सिद्दी जौहार काय पण चरफडला असेल! त्या फाझिल मुहम्मदाची मला जास्त कीव येते. अफझुलखानाला आपण बुडवले, तेव्हा या चिरंजीवांनी पळ काढला. आता बापाचा सूड घेण्यास सिद्दीस सामील झाला; पण खोट्या नशिबाचा.

शिवाजी : सिद्दी निधड्या छातीचा वजीर. भर पावसात पावनगडावर मोर्चे बांधले व भांड्यांचा मारा केला. पावसाची पर्वा न धरता चार महिने झुंजला.

एक सरदार : आता सुद्धा पाठलागावर सिद्दी असेलच. फाझिल मुहम्मद तर खास असणार. त्याला ही सोन्याचीच संधी. (बाजी प्रभू येतो.)

बाजी : महाराज, घात झाला. शत्रूचे सैन्य अगदी नजीक येऊन ठेपले. सैन्य अफाट आहे.

शिवाजी : (उठून) भवानी आई करील ते खरे. आता एक क्षण दवडता कामा नये. पण पुढची मजल बिकट. घाटावरची चढण. गनीम तर पाठीवर येऊन ठेपला. काय करावे? का उलटून तोंड देता?

एक सरदार : छे! छे! महाराज, गनिमाचा जमाव मोठा. तयारी जबर! छे! आपण गडच गाठला पाहिजे.

शिवाजी : चला तर मग गडच गाठू; पण गनीम आधी आपल्याला गाठील त्याची काय वाट? त्याला कोण थोपवणार?

बाजी : महाराज, आपण सैन्य घेऊन लागा घाट चढायला. माझे मावळे गडी राहू द्या माझ्यापाशी, या घोडखिंडीत चौक्या बांधून धरतो गनिमाला थोपवून.

शिवाजी : बाजी, काय बोलता? जोहारची अफाट सेना या खिंडीत तुम्ही थोपवणार?

बाजी : होय महाराज, थोपवणार, अडवणार! तो पाहा भगवान सूर्यनारायण दिसू लागला. त्याच्या शपथ, आपल्या पायाशपथ. एका तुर्काला गड चढू देणार नाही. निघावे आपण. (एक पाईक येतो.)

पाईक : सरकार, दुश्मन आला. आता थांबायला वेळ नाही.

शिवाजी : ईश्वरेच्छा! बाजी, राहा तर मग खिंडीत. आम्ही

गडावर पोचल्यावर भांड्याचे पाच आवाज काढू. तोवर खिंड राखा. मग येऊन मिळा. (गहिवरून त्याला मिठी मारून) पण – पण बाजी,. आता आपली भेट?

बाजी : महाराज, आपल्या अंगस्पर्शाने पवित्र झालो. दशसहस्र हत्तींचे बळ चढले. निघावे आपण. (मागे बंदुकीचा आवाज) आजवर माझी भलीबुरी चाकरी घेतली तशी बाबाजीची घ्या.

शिवाजी : ठीक आहे. चला मंडळी. आपण कमनशिबी! बाजींचा आजचा पराक्रम विमानातून देव पाहणार! (बाजीकडे पाहात पाहात जातात.)

बाजी : गेले महाराज, मला धास्ती होती स्वतःच इथं राहतात की काय! (महाराजांकडे पाहून) पाय उचलत नाही. पाठीमागे दृष्टी (इसून मावळ्यांना) माझ्या दादांनो, ते पाहा, महाराज गड चढत आहेत. इकडे पाहा. तो सिद्दी जौहार महाराजांना धरण्यास येत आहे. बोला, महाराज गड गाठीतोवर खिंड राखणार का निमकहराम होणार?

मावळे : खिंड राखणार! नाव राखणार!

बाजी : शाबास माझ्या पठ्ठ्यांनो! लागा कामाला बिगिबिगी. विसरा आता बायका–मुले. महाराज काय म्हणाले? तुमचा आमचा पराक्रम पाहण्यास आज वरचे देव खाली उतरणार. त्यांचा हिरमोड करू नका. चला, जागोजागी मोर्चे बांधा. झाडीतून लपून बसा. गनीम खिंड चढू लागताच दगड

गोटे हाणा. कुणी तुरूक खिंडीतून डोके काढू लागताच चेचा त्याला. गडावरील खबर येईपर्यंत कुणी वर येता कामा नये.

मावळे : जशी आज्ञा! (जातात.)

बाजी : गेले. महाराज दिसेनासे झाले. हा गनिमाचा जमाव आला. ती आघाडीची टोळी. हुशार! चालवा मारा (आवाज होतो.) छान! चालू द्या, चालू द्या. (परत आवाज.) छान, भली मोडली खोड. थांबा; सावध राहा. ती आली दुसरी टोळी. थांबा, लागू द्या त्यांना चढायला. हं, व्हा तयार. आले टप्प्यात. सोडा! (आवाज) पडले मुंडेच्चित. वा रे बहाद्दर! वा रे मर्द!! आले, परत आले. ही तिसरी टोळी. (पुढे होतो.)



येऊ दया. चढू दया वर. हं! पाठवा त्यांना त्यांच्या दोस्तांच्या भेटीला. सोडा. (इतक्यात दंडाला गोळी लागते.) अरे भिवबा, मुंडाशाचे फडके काढून बांध रे जखम.

भिवबा : (जखम बांधतो.) सरदारसाहेब, आता आपण असे तोंडावर उभे राहू नका.

बाजी : वेडया, मी महाराजांचा सरदार. जा आपल्या जागेवर.

(काही वेळाने खिंडीशी पाच पंचवीस जखमा झालेला, रक्ताने माखलेला, दोन पाइकांच्या मदतीने उभा असलेला बाजी प्रभू.)

बाजी : वा रे माझ्या पठ्ठयांनो, वा रे माझ्या दादांनो, चालू दया! चालू दया! दम सोडू नका. आता होईल गडावरील भांडयांचा आवाज. तुम्ही आता थोडे उरलात, दमलात, सकाळपासून शिणलात. अरे, हे काय? सारे सैन्यच चाल करून आले. हा शेवटचा हल्ला! ठीक आहे. हं! हुशार! उठा माझ्या दादांनो! उठा माझ्या मर्दांनो! जितके मावतील तितके व्हा पुढे अन् रहा खिंडीच्या तोंडाशी तोंड दयायला! जा, जा पुढे. हं ठीक ठीक. तुम्ही तयार असा. तुमची पाळी आली की व्हा पुढे. ते कापले गेले की घ्या त्यांची जागा. भलेशाबास! मारा धक्के. हाणा बंदुकीचे तडाखे डोक्शात. ढकला खाली. वा रे मर्द! वा रे बहाद्दर! आज देवांना तुमचा हेवा वाटणार. महाराज इथं पाहिजे होते आज तुमचं कौतुक करायला. (शुद्‌ध जाऊ लागते. पाईक तोलून खाली बसवतात.) महाराज, काय हा वेळ?

किती अंत पाहता ? सारे जिवाचे साथीदार चालले. किती वेळ जगू ? ऐकू दया आवाज, महाराज, ऐकू दया आवाज ! डोके फिरू लागले. कान बहिरे होत चालले. मायबाप, ऐकू दया आवाज. हे काय ? जिकडे तिकडे महाराज ! तू कोण ? बाबाजी ? उगा, रडू नकोस ! तू-तू-तू कशी आलीस ? जा, नाही येत घरी. मी महाराजांचा सरदार ! साहेब-काम सोडून घरी येऊ ? जा फीर परत. (तोफेचा आवाज.)

एक पाईक : (मोठ्याने) सरदारसाहेब, आला आवाज. पोचले महाराज !

बाजी : काय म्हणतोस ? आला अजीज ! मारा चेचा. लावा पिटाळून.

पाईक : (मोठ्याने बाजीच्या कानात ओरडून) भांड्यांचा आवाज आला ! आवाज आला ! (तोफेचा दुसरा आवाज).

बाजी : (उसळीसरसा उभा राहून) आला आवाज ! आला आवाज ! फत्ते ! फत्ते ! (तोफेचा तिसरा आवाज) झाले, संपले काम. सांगा रे महाराजांना, साहेब-चाकरी बजावली. महाराज पोहोचे-पर्यंत तुरुकाला खिंडीखाली दाबला ! (चौथा आवाज) चाकरी बजावली. येतो आम्ही. शंकर ! शंकर ! शंकर ! (पाचवा आवाज) जय शंकर ! (खाली पडतो.)

गनीम=शत्रू, भांड्यांचा = तोफांचा, तुरुक = मुसलमान, पाईक = शिपाई, दशसहस्र = दहा हजार, बाबाजी = बाजीचा मुलगा, साहेब-काम = धन्याचे काम.

# ३२. गाणी

## १. ये ग तू ग गाई

ये ग तू ग गाई चरूनी भरूनी।
बाळाला म्हणूनी दूध देई॥

ये ग तू ग गाई खा ग तुझा कोंडा।
बाळाला दूध, मांडा देईन मी॥

ये ग तू ग गाई खा ग तू कणीस।
बाळाला नीरसं दूध देई॥

ये ग तू ग गाई दे ग दूध तुझं।
ते पाजू तुज बाळराज॥

गाई ग गोठ्यात म्हशी ग रानात।
संजूबाळ पाळण्यात दूध मागे॥

अंगाई मंगाई तांबूली कंगाई।
आता तान्हियाला घोट दूध देई॥

## २. पक्षी जाय दिगंतरा

पक्षी जाय दिगंतरा। बाळकासी आणी चारा॥
घार हिंडते आकाशी। झाप घाली पिल्लांपाशी॥
माता गुंतली कामासी। चित्त तिचे बाळापाशी॥
वानर हिंडे झाडावरी। पिली बांधुनी उदरी॥
तैसि आम्हांसी विठ्ठल माये। जनी वेळोवेळी पाहे॥

## ३. देवाचा देव

असा कसा देवाचा देव बाई ठकडा।
देव एका पायाने लंगडा ग बाई॥ ध्रु०॥
गवळ्या घरी जातो। दहीदूध खातो।
करि दह्यादुधाचा रबडा ग बाई॥
शिंकेचि तोडितो। मडकेचि फोडितो।
पाडि नवनीताचा तो सडा ग बाई॥
वाळवंटी जातो। कीर्तन करितो।
घेतो साधुसंतासि झगडा ग बाई॥
एका जनार्दनी। भिक्षा वाढा बाई।
देव एकनाथाचा बचडा ग बाई॥

